# रत्नांचे रूपांतर

फक्त आपल्याच देशात नव्हे तर जगातील सर्वच देशात, प्राचीन काळापासून आजवर सुभाषिताची गोडी लोकाना आहे अेखादा चागला एचकर विचार जर घोटीव आणि गोडस शब्दात माडला गेला तर लोक त्यावर अितके खुश होतात की तो समाजात अेखाद्या चलणी नाण्याप्रमाणें चालू लागतो बिलोरी काचेप्रमाणें चमकणारें अेखादे वचन अशा रीतीने हाती आले असता ते पूर्णपणें खरे आहे किंवा नाही याची खात्री करून घेण्याचे देखील मनुष्याला सुचत नाही सुभाषिताची मोहिनी खरोखरच और असते

जुन्या काळी सुभाषिते श्लोकबद्ध करीत किंवा म्हणीप्रमाणे त्याना चालू करीत असत

आजकालच्या युगात प्रत्येक लोकप्रिय व्यक्तीला स्वाक्षरी देण्याचे प्रसग वारवार येतात स्वत च्या सहीबरोबर अेखादें सुदर वचनहि द्यावे लागते कित्येक लोक अेकच ठराविक वचन नेहमी लिहून देतात कित्येक लोक थोरामोठ्याचे अेखादे वचन, आठवेल तसे लिहून काढतात, आणि कित्येक लोक त्या त्या प्रसगी जशी स्फूर्ति होओील त्याप्रमाणें अेखादें वचन रचून तेच लिहून देतात

'स्वाक्षरी देत नाही,' असे म्हणून भागत नाही. नागणाऱ्याच्या लाघवीपणापुढें हार खावीच लागते, आणि बराच वेळ चर्चेत जातो तो निराळा अनुभवानें शहाणे होअून मी ठरवले की वेळ वाचवावयाचा असेल तर ऑटोग्राफ आणि फोटोग्राफ दोहोना नाही म्हणू नये माझ्यासारख्या सामान्याची जर ही कथा तर प्रतिभावान

कवीच्या स्थितीची कल्पनाच करणें वरें आपले कवि श्री रवीन्द्रनाथ ठाकुर हे जेव्हा जापानला गेले होते तेव्हा त्याना भेटावयास येणारे तिकडील लोक हातात अेक पखा घेअून येत आणि त्यावरच कवी-कडून अेखादी सूक्ति आणि सही मागून घेत अशा त्याच्या वचनाचा सुंदरसा संग्रह 'फायर फ्लाअिज्' (काजवे) या लुकलुकणाऱ्या नावानें प्रसिद्ध झाला आहे

लेबेनॉनचा आर्मीनियन कवि खलिल जिब्रान आता महाराष्ट्रात बराच प्रसिद्ध झाला आहे तो अमेरिकेंत जाअून राहिला तेव्हा त्यालाहि, अशाच रीतीने, सूक्ति आणि स्वाक्षरी द्याव्या लागत श्रीमती बार्बरा यंग या त्याच्या मैत्रिणीने हौसेने अशा सूक्तीचा संग्रह करून 'सँड ॲण्ड फोम' या नावाने प्रसिद्ध केला आहे. तसे पाहिले तर समुद्रकाठची रेती आणि त्यावर पसरलेला लाटाचा फेस याचा अुपयोग काय? पण त्याचे आकर्षण खरोखरच असाधारण. असते वाळूवर लिहिलेले लाटानी धुवून जाते आणि फेस वाऱ्याने अुडून जातो तरीहि वाळू आणि फेस आनंदाबरोबर काहीना काही बोध देतच असतात

जिब्रानच्या 'प्रॉफेट' सारख्या पुस्तकातील तत्त्वज्ञान जसें काव्यमय आहे तसेंच ते अुद्‌बोधकहि आहे यामुळें त्याच्या पुस्तकाची भाषांतरे जगातील अनेक भाषांतून झाली आहेत आणि होत आहेत अिंग्रजीसारख्या परकी आणि अपरिचित घडणीच्या भाषेंतून देशी भाषेंत भाषांतर करणे सोपें नसते त्यातल्या त्यात मूळ लिखाण जर रत्नाच्या पैलूदार खड्याप्रमाणें रेखीव असले, चमकदार असलें, तर त्याचे भाषांतर तितकेंच पैलूदार झाले तर ते अुपयोगी कारण अशा सूक्तीची खुबी विचाराच्या गांभीर्या-

वर आणि प्रसादावर जितकी अवलबून असते तितकीच किंवा त्याहून अधिक भाषेच्या सुभग आणि आल्हादक चमत्कृतीवर अवलबून असते

भाषातराचे काम जितके कष्टसाध्य असते तितकेच ते रोचकहि असते मात्र त्यासाठी रिकामपण आणि तारुण्याचा अुत्साह हवा

भाषातराची प्रथम गोडी मी चाखली ती स्वामी विवेकानद आणि स्वामी रामतीर्थ याच्या अिंग्रजी लेखाचे मराठी करताना पुढेपुढे महात्मा गाधीच्या अिंग्रजी लेखाचे गुजराती करण्याचे काम जेव्हा आमच्या वाटचास आले, तेव्हा महादेव देसाअी, स्वामी आनद आणि मी अेकत्र बसून, भाषातरकलेचा सामुदायिक आनद मिळवू लागलो परेंच लेखक पॉल रिशाच्या 'दि स्कर्ज ऑफ् क्रािअिस्ट्' या अिंग्रजी पुस्तकाचे, केवळ हौस म्हणून, गुजरातीत मी भाषातर केले होते

पुढे तो अुत्साह ओसरला आणि अितर कामाचे अधिक महत्त्व वाटू लागले अेकदा वर्ध्याला जेव्हा मी कॉलेऱ्याने आजारी पडलो आणि कसावसा त्यातून वाचलो, तेव्हा चि अिन्दू गुणाजी रोज माझ्या समाचारास येअी येताना बरोबर कोठून तरी चागली टवटवीत फुलें आणून माझ्या खोलीत ती सजवी आणि अिकडच्या तिकडच्या गोष्टी करून परत जाअी अेकदा अिन्दू म्हणाली "तुम्हाला काही लिहावेसे वाटत नाही ? मी लिहावयास तयार आहे" कॉलेऱ्याने सर्व शक्ति धुअून गेली असता काही मौलिक लिहिण्याचा अुत्साह नव्हता तेव्हा सहज वाटले की खलिल जिब्रानच्या 'सँड ॲन्ड फोम' चे भाषातर करावे रोज अेकदोन वचने लिहविली तरी सहज भागण्याजोगे होते पण अेकदा प्रवाह सुरू

झाला की त्याचा वेग मंद राहत नाही हळूहळू तीनशें सवातीनशें वचने पूर्ण झाली आणि मी वरा होऊन कामाला लागलो

या गोष्टीला बारा वर्षाहून अधिक काळ लोटला विचारें हस्त-लिखित पडूनच राहिलें होते चि० सरोजिनीनें कोठून तरी शोधून काढलें आणि छापण्यासाठी तयार करवून घेतलें

अशा वचनाचे रहस्य जर उकलून दाखविता आलें तर वाचकाची मोठी सोय होते आणि अेकेका वचनावर लहानमोठें भाष्य लिहिणेंहि शक्य असते अेकदोघा स्नेह्यानी तशी सूचनाहि केली, पण मला वाटलें की अशा सारगर्भ वचनाचा बोध त्याच्या पोटातच असलेला वरा वाचकाने आपआपल्या अनुभूति व अभिरुचीप्रमाणें त्यातून हवा तो आणि हवा तितका बोध आणि आनद मानून घ्यावा रविबाबू देखील केव्हा केव्हा कवीला साजेल अशा काकुळतीने म्हणत की, "बाबानो, घेणेकऱ्याप्रमाणे माझ्यामागें अर्थाचा तगादा लावू नका '

भाषातरकाराला अर्थ केल्यावाचून सुटका नसते आणि जर भाषातर नीट वठलें नाही अशी हुरहुर लागली, किंवा तें अेकागी झालें अशी शका आली, तर दोनदोन तीनतीन प्रकारें भाषातर करावें लागते केव्हाकेव्हा भावाचे स्पष्टीकरण केल्यावाचून राहवत नाही मुळातच जर अेखादा मार्मिक किंवा शाब्दिक श्लेष असला तर त्याचे भाषातर कितीहि चापलें केलें तरी ते तृप्ति देऊ शकत नाही अुदाहरणार्थ "He who longs the most lives the longest" यातील "long" शब्दावरील कोटि भाषातरात कशी आणावयाची ?

मला कबूल केलें पाहिजे की चारपाच ठिकाणी भाषातर करावयाचे म्हणून ते करून मी मोकळा झालो आहे मूळ वचनातूनच

जेथे प्रचीति प्राप्त झाली नाही तेथे ती भाषांतरांतून कोठून व्यक्त होणार? अशा वेळी भाषांतरकार अेखाद्या डाकवाल्याप्रमाणे वाचकाना म्हणतो, 'हे घ्या, तुमच्या नावाने आलेले पत्र यांत जे काय लिहिलें असेल त्याच्याशी माझा काहीच संबंध नाही पोहोचविण्याचे काम माझें बाकीचे तुमचे तुम्ही पाहून घ्या'

अर्थात् अशी वचने गाळता आली असती, पण डाकवाल्याची भूमिका धारण केल्यानंतर तसें करण्याची आवश्यकता नव्हती ।

या संग्रहातील काही बोल लाखाच्या मोलाचे आहेत काही बोल अनुभूतीच्या खोलीतून अुमटलेले आहेत, काही अुद्दाम आहेत, तर काही रूढ कल्पनाना धक्का देअून विचाराना नवीनच दिशा लावणारे आहेत सर्वच बोलांतून असाधारण आनंद प्राप्त होतो निदान मुळात तो थबथबलेला आहे यांत शंका नाही

कवि बुद्धीचा वेधक व कल्पनेचा शूर असल्याने गूढ विचारक् झाला आहे त्याचे विचार मननादराला पात्र आहेतच पण जेथे अेखादा सुधारक पुरुष देखील आपल्या संस्कृतीच्या आणि काळाच्या मर्यादा अुल्लंघू शकत नाही तेथें कल्पना हेच ज्याचे भांडवल अशा कवीची काय कथा? त्याचा बंडखोरपणादेखील त्याच्या स्वतंच्या युगातील दोषावरच आधारलेला असतो

कवि-विचारकाची वाणी विचारपूर्वकच ग्रहण केली पाहिजे कारण अंधश्रद्धा नास्तिकतेपेक्षा अधिक भयानक असते

शूराचा पराक्रम पाहून आपल्याला त्याचा आश्रित बनण्याची अिच्छा होअू नये अुलट त्याच्याप्रमाणेंच पण अेखाद्या स्वतंत्र क्षेत्रात आपणहि पराक्रम करावा असा अुत्साह वाटला पाहिजे खोल विचार

।

अैकून मंत्रमुग्ध न होता स्वतः खोलपणें विचार करण्याची वृत्तीच आपल्यात जागृत झाली पाहिजे. कवीची कदर करण्याचा हाच खरा मार्ग होय.

पुस्तकाचे मूळ नाव बदलून त्याला स्वतंत्र निराळें नाव दिले याचे स्वर्गस्थ कवीला वैषम्य वाटणार नाही अशी अुमेद आहे.

पुस्तकाच्या प्रकाशनाची तयारी करण्यात ज्यांनी ज्यांनी मला मदत केली त्यांना त्यांना तसें करताना आनंदच वाटला आहे. मग त्यांचे आभार मानून मी त्यांना कष्टी काय म्हणून करावें?

नवी दिल्ली, १०-७-'५१ काका कालेलकर

१

अेका बाजूला वाळूचा विशाल पट आणि दुसऱ्या बाजूला समुद्राचे फेसाळ हास्य, या दोहोंच्यामधून किनाऱ्याकिनाऱ्यानें मी सतत चालत आहें

वाळूवर माझी पावलें अुमटत आहेत, पण भरतीच्या लाटा त्याचा मागमूसहि राहू देणार नाहीत

समुद्राचा फेस वाळूवर पसरतो, पण वारा येअून त्याला पाहता पाहता अुडवून देअील

फक्त समुद्र आणि त्याचा किनारा हे मात्र आहेत तसेच सदा-सर्वदा असणार

[देवाची सृष्टि सनातन सत्य आहे, या सृष्टीतील मानवाची यात्रा मात्र नश्वर आहे म्हणूनच मानवी सृष्टीला क्षणभंगुर म्हटले आहे

लाटा येतात व वाळूला धुवून साफ सपाट करतात अुलट वाळू देखील लाटांच्या आक्रमणाला आटवून टाकते हे सनातन व सहकारी खेळगडी अेकमेकाच्या सहवासात कसे चूर आहेत!]

२

अेकदा मी आपल्या मुठीत धुकें धरले थोडया वेळानें मूठ अुघडून पाहतो तो धुक्याचा अेक किडा झाला होता

• मी पुन्हा मूठ झाकली आणि अुघडली पाहतो तो त्याच ठिकाणी किडयाचे अेक फूलपाखरू झाले होते

मी पुन मूठ झाकली आणि पुन अुघडली, पाहतो तो माझ्या ओंजळीत अेक वामन मूर्ति विषण्ण वदनानें आकाशाकडे टक लावून अुभी आहे

[मी चटकन् मूठ मिटली आता ती अुघडावी किंवा नाही याची मला चिंताच पडली पण राहवेना म्हणून] मी पुन मूठ अुघडली, आणि पाहतो तो हातात केवळ घुकेंच अुरलेले!

फक्त अेक नितांत मनोहर गीतच काय तें मला अैकू येअू लागलें

३

अगदी कालपर्यंत माझी कल्पना होती की मी म्हणजे या ब्रह्मांडात ताळतंत्रावाचून धक्के खाणारा अेक तुकडाच आहे

आज मला साक्षात्कार झाला की, मीच ते ब्रह्मांड असून जगातील सर्व जीवन अनेकविध शकलाच्या रूपानें माझ्यामध्यें तालयुक्त नृत्य करीत आहे

[या साक्षात्कारानंतरच मी कवि बनलो]

४

लोक त्याच्या जागेपणी मला म्हणतात, "तू आणि तुझें विश्व म्हणजे अनंत सागराच्या अनंत किनाऱ्यावरील वाळूचा अेक कण आहात"

मी लोकाना स्वप्नात अुत्तर देतो, "अहो! मीच तो अनंत सागर

आहे, आणि तुमची सर्व विश्वे म्हणजे माझ्या किनाऱ्यावरील वाळूचे कण होत "

[जगाच्या स्थूळ व्यवहार-दृष्टीला जर जागेपण म्हणावयाचे तर माझ्या तत्त्वानुभूतीला स्वप्न म्हटल्यावाचून गत्यतर काय? यस्या जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुने ।]

५

अुभ्या आयुष्यात अेकदाच मला निरुत्तर व्हावे लागले होते. कारण अेकाने मला हटकले आणि विचारले, "तू रे कोण?"

[मी त्याला अुत्तर काय देणार? न सांगणें चुकीचे झाले असते व सांगायला माझ्याजवळ शब्दच नव्हते ]

६

औश्वराचा पहिला विचार — देवदूत
औश्वराचा पहिला शब्द — मनुष्य
[औश्वराचे पहिले कर्म — प्रेम ]

७

लक्षावधि वर्षे आपण पख फडफडवणारे, जगभर भटकणारे आणि वासनेच्या वावटळीत सापडलेले मूक प्राणी होतो अरण्यातील वाऱ्यानी आणि महासागराच्या लाटानी आपल्याला भाषा शिकविली

अेवढ्च आपल्याला जी वाचा कालच फुटली, तिच्या जोरावर आपण आपल्यातील पुरातन पुरुषाला व्यक्त कसे करू शकणार?

८

[मिश्र (औजिप्त) देशात नाअिल नदीच्या काठी पिरॅमिडच्या शेजारी खडकात कोरलेला अेक प्रचण्ड शिला-यक्ष (sphinx) आहे

या यक्षाचे मौन अनंत काळाचे साक्षी आहे त्याच्या वेधक दृष्टीला सगळा भविष्यकाळहि भूतकाळासारखाच आहे ] हा शिला-यक्ष अेकदाच बोलला. तो म्हणाला, "वाळूचा अेक कण म्हणजे मरुभूमि होय आणि मरुभूमि म्हणजे वाळूचा अेक कण होय [याहून सांगावयाचे काय अुरले ? ] आता आपण सर्व पुनः मौन सेवू या "

मी त्या शिलायक्षाचे शब्द अैकले, परंतु मला त्याचा अर्थ कळला नाही

[तसें म्हटलें तर शिला-यक्षाचे ते वचन फारच थोडयाच्या कानी पडले व ज्यानी ते अैकले त्याना ते समजले नाही आता अनन्त काळपर्यंत त्या वचनाचा हवा तसा अर्थ लावण्याची मोकळीक आपल्याला मिळाली आहे ]

९

अेकदा मी अेका स्त्रीच्या चेहऱ्यामध्ये न्याहाळून पाहिले तेथे मला तिची न जन्मलेली सर्व संतति दिसून आली !

आणि जेव्हा त्या स्त्रीने माझा चेहरा टक लावून पाहिला तेव्हा तिला तेथें, तिच्या जन्मापूर्वीच मरून गेलेले माझे सर्व पूर्वज दिसले !

[यानंतर आम्हाला अेकमेकाकडे बघवेचना आम्ही अेकमेकाचे पूजक झालो, पण पूरक होअू शकलो नाही आम्हाला या स्थितीतच पूर्ण संतोष मात्र मिळाला खरा ]

१०

मला आता वाटते की आपण कृतार्थ व्हावे. पण त्याकरिता मला पृथ्वीप्रमाणे अेक ग्रह बनून चैतन्ययुक्त व बुद्धिमान जीवाना आपल्या पाठीवर धारण करावयास नको का ?

प्रत्येक मानवापुढें हाच आदर्श नाही का ?

[असंख्य जीवांना आधारभूत झाल्यावाचून आपल्या जीवनाचें सार्थक व्हावयाचें नाही ]

११

[मोती मोती म्हणजे काय ? ] मोती म्हणजे वेदनेने अेका वाळूच्या कणावर बांधलेलें [लावण्य-युक्त] देअूळ होय

मग आपली हीं शरीरें कोणत्या वाळूच्या कणाभोवती कोणत्या ओढीने रचलेली मंदिरें म्हणावयाची ?

१२

ओीश्वराने जेव्हा अेखाद्या भिंगरीप्रमाणे मला या अद्भुत जीवन-सरोवरात फेंकून दिले तेव्हा त्याच्या पृष्ठभागावर मी असंख्य वर्तुळें तयार केली

पण जेव्हा त्याच्या खोलीपर्यंत पोहोचलो तेव्हा मात्र मी अगदी शांत झालो

[माझ्या-अवगाहनामुळें सरोवराचे पाणी किती वाढलें हें मात्र सांगता येणें कठीण आहे ]

१३

मला मौनशांतीचें वरदान द्या, म्हणजे केवढीहि दीर्घ रात्र असली तरी तिला मी पुरून अुरेन

१४

[माझी काया आणि माझा आत्मा यांचें कितीतरी युगे झाली पटत नव्हतें शेवटी शुभ मुहूर्त सापडला ] आत्मा आणि काया यांचे प्रेम-लग्न झाले त्या क्षणापासूनच मला नवा जन्म लाभला

१५

माझ्या ओळखीचा अेक माणूस होता त्याचे कान अतिशय तीक्ष्ण होते पण वाणीने मात्र मुका कुठल्याशा लढाअीत त्याची जीभ कापली गेली होती

जीभ जाण्यापूर्वी त्याने कोणकोणच्या लढाया मारल्या होत्या याची सर्व बातमी मला मिळाली आहे तो जेव्हा मेला तेव्हा मला बरेंच वाटले

कारण तो आणि मी या जगात अेकत्र नांदू शकण्याअितके हें जग मोठें नाहीच

१६

कितीतरी युगे मी मूकपणे मिस्र देशाच्या मातीत मिसळून पडलो होतो मला व्यक्तित्वच नव्हते मग ऋतुचक्राची कल्पना कोठून असणार ?

पुढें सूर्याला वाटलें की, याला जन्म द्यावा मी मातीतून अुठून अुभा राहिलो आणि नाअील नदीच्या काठाकाठाने दिवसासंगें गात व रात्रीसंगें स्वप्ने सेवीत हिंडू लागलो

[पण सूर्याला आता माझा वीट आला आहे ] त्याने मला हजारों पावलांनी चिरडून जमीनदोस्त करण्याचा, अिजिप्तच्या मातीत मिसळून टाकण्याचा, प्रयत्न चालविला आहे

पण केवढें आश्चर्य ! केवढें गूढ कोडे ! की ज्या सूर्याने मला जन्म दिला तोच मला मारू शकत नाही ज्याने माझा सहार* केला त्याला आता मात्र माझा सहार करता येत नाही ! मी

* सहाराचा अेक अर्थ होतो गोळा करणें, अेकत्र आणणें

आपला ताठरपणे नाअील नदीच्या किनाऱ्यावर आपली धीरोद्धत पावलें टाकीत चाललीच आहे

## १७

अेखाद्याची आठवण करणे म्हणजे अेकपरी त्याला भेटण्या-मारखेच आहे स्मरण म्हणजे (आपल्या हाती असलेले) स्वायत्त मीलनच होय

## १८

आणि विस्मरण म्हणजे अेक प्रकारची मुक्तीच होय

किंवा विस्मृति म्हणजे स्वच्छन्दी जीवनाचा अेक नमूना म्हणता येअील

## १९

आम्ही काळ मापतो तो अनत कोटी सूर्यांच्या गतीवरून आणि जगातले लोक आपला काळ मापतात तो त्यांच्या लहानशा खिशातील चिमुकल्या यत्राच्या साहाय्याने

तेव्हा आता सांगा की या लोकांना भेटण्यासाठी अमुक स्थळ आणि अमुक काळ कसे ठरवावयाचे ?

## २०

पृथ्वी आणि सूर्य याच्यामध्यें केवढे मोठें अतर आहे! पण आकाशगगेच्या खिडकीतून बघणाराला तें शून्याहूनदेखील कमीच भासतें

## २१

मानवता म्हणजे माजी आनन्त्यापासून स्थायी आनन्त्याकडे वाहणारी प्रकाशसरिता होय

## २२

मनुष्यप्राण्याची वेदना पाहून स्वर्गीच्या अमरांना हेवा वाटत नसेल काय?

[खरोखर वेदना हीच जीवनसमृद्धि आहे तिच्या अभावी आकाशातील देवाचें अळणी जीवन त्याना भारभूत वाटत असले पाहिजे]

## २३

अमरापुरीच्या यात्रेला निघालो असता वाटेंत अेक सहयात्री भेटला

"अमरापुरीला जाण्याचा रस्ता हाच ना?" असे मी त्याला विचारले

"हो, माझ्या मागोमाग या अेक दिवस आणि अेक रात्र चालून आपण अमरापुरीला सहज पोचू"

मी त्याच्या मागोमाग चाललो कितीतरी दिवस आणि कितीतरी रात्री आम्ही चाललो पण अमरापुरी काही येअीना!

पण सर्वांत आश्चर्याची गोष्ट म्हणजे माझी दिशाभूल केल्याबद्दल माझा सहयात्री [क्षमा मागण्याअैवजी] माझ्यावरच रागावू लागला!

## २४

हे प्रभो! सशाला माझ्या आहारी पोहोचविण्यापूर्वी मलाच सिंहाचा आहार करून टाक.

[दुसऱ्याचे मास मी खाण्यापेक्षा माझेंच मास दुसऱ्यानें खाल्लेले मला पत्करले]

## २५

पहाटेचे दर्शन करावयाचें असेल तर रात्रीच्या रस्त्यानें गेल्यावाचून गत्यंतर नाही.

## २६

माझें घर मला म्हणते, "मला सोडून जाऊं नकोस तुझा भूतकाळ येथेच वसत नाही का?"

आणि रस्ता मला म्हणतो, "चल, ये माझ्या बरोबर—कारण मी तुझा भविष्यकाळ आहें"

मी माझ्या घराला व रस्त्याला दोघानाहि सांगतो, "मला भूतकाळहि नाही आणि भविष्यकाळहि नाही मी जर येथेच राहिलों तर माझ्या राहण्यात देखील जाणें समावलेले आहेच आणि मी जाऊं लागलो तरी माझ्या जाण्यात राहणे साठलेले आहेच फेरफार करण्याची शक्ति फक्त प्रेमात आणि मृत्यूत आहे"

## २७

मऊ पराच्या गादीवर निजणाऱ्याची स्वप्नें अधिक सुंदर असतात, आणि कठीण जमिनीवर निजणाऱ्याची स्वप्नें ओबडधोबड असतात—असा जोवर अनुभव नाही तोवर जीवनामध्ये न्याय आहे, याविषयी मी अविश्वास कसा करावा?

## २८

केवढी नवलाईची गोष्ट की विशिष्ट प्रकारच्या सुखाची वांछा होच माझ्या वेदनेचा एक अंश आहे

आजवर सात वेळा मला माझ्या आत्म्याचा तिरस्कार वाटला आहे सात वेळा मी स्वतःचा धिक्कार केला आहे

स्वतःची महत्त्वाकांक्षा सिद्ध व्हावी म्हणून जेव्हा माझे हृदय पड खाण्यास तयार झाले, तेव्हा मला माझा प्रथम तिटकारा आला.

लंगडणाऱ्या दुर्दैवी प्राण्याची टवाळी करण्यासाठी जेव्हा माझे हृदय त्याची नक्कल करू लागले तेव्हा मला दुसऱ्यादा स्वतःची किळस वाटली

कठीण आणि सोपा असे दोन मार्ग समोर आले असता जेव्हा माझ्या हृदयाने भ्याडपणाने सोपा मार्ग पत्करला तेव्हा तिसऱ्यादा मला स्वतःची शिसारी आली

जेव्हा माझ्या हातून अपराध घडला, तेव्हा अितर लोकहि असाच अपराध करीत असतात असें म्हणून जेव्हा मी माझें सात्वन करू लागलो, तेव्हा चौथ्यादा मला स्वतः सबवाने तुच्छता वाटली

दुबळेपणाने अन्याय सहन करीत असता, सहन करण्याची कला हीहि अेक शक्ति आहे, असें म्हणून जेव्हा मी स्वतःची आत्मवचना केली तेव्हा पाचव्यादा मला स्वतःची कीव वाटू लागली

कोणा अेकाचा कुरूप चेहरा पाहून आपला स्वतःचाच तो अेक मुखवटा आहे, हे ओळखण्याअैवजी कुरूपतेचा तिरस्कार करण्यास जेव्हा मी प्रवृत्त झालो, तेव्हा सहाव्यादा मला माझी लाज वाटली

आणि दुसऱ्याचे स्तुतिस्तोत्र गाताना हा सुद्धा अेक सद्‌गुणच आहे असें स्वतःला भासवण्याचा जेव्हा मी प्रयत्न केला तेव्हा सातव्यादा माझें अगदी पाणी पाणी झाले

[आता स्वत ला स्वत चे तोड दाखवण्यापूर्वी मला कितीतरी घोर तपश्चर्या केली पाहिजे ! ]

## ३०

शुद्ध केवल सत्य मला अजून कळलेले नाही पण माझ्या अज्ञानापुढे मी नम्र आहे, यातच माझी खरी प्रतिष्ठा आणि तिचे फल मला मिळते

[माझ्या अज्ञानाची मला जाणीव आहे त्यामुळे मी नम्र असतो या नम्रतेमधेच माझी खरी अुन्नति आहे आणि कधी तरी सत्यनारायणाचे दर्शन होअीलच असा विश्वासहि त्या नम्रतेत साठविलेला आहे ]

## ३१

मनुष्याची कल्पना आणि मनुष्याची सिद्धी याच्यामधले अतर कापून कमी करण्याची शक्ति त्याच्या तळमळीतच आहे

## ३२

नदनवन काही फार दूर नाही त्या दाराच्या मागे शेजारच्या खोलीतच ते आहे त्याची किल्ली मला सापडत नाही अितकेच

मीच कोठे तरी डाव्याअुजव्या हाताने ती ठेवली असावी

## ३३

तू आधळा आहेस व मी बहिरा आणि मुका आहे तेव्हा आपण हाताला हात मिळवू या म्हणजे अेकमेकाचे अिंगित अेकमेकाला समजेल

## ३४

मनुष्याच्या जीवनाचे रहस्य त्याच्या सिद्धीत नसून त्याच्या आराक्षेवरच अवलबून असते

## ३५

आपल्यापैकी काहीजण शाईसारखे असतात आणि काहीजण कागदासारखे असतात काही लोकात जर मुळीच काळिमा नसता तर बाकीचे लोक मुके झाले असते आणि काही लोकात जर धवलिमा नसता तर बाकीचे लोक आवळे राहिले असते

## ३६

ऐकायला कान असले तर बोलणारी वाणी त्याना भेटावयाचीच. जेथें म्हणून श्रोता आहे तेथें वक्ता उत्पन्न व्हावयाचाच

## ३७

आपले मन स्पजासारखें असते पण हृदय झऱ्यासारखें असते.

बरीचशी माणसे झऱ्याप्रमाणे वाहण्याचे सोडून स्पजाप्रमाणें शोषण करीत राहणे पसत करतात, हे आश्चर्य नव्हे काय?

## ३८

आपल्याला काय हवें आहे हे जेव्हा तुम्हाला सागता येत नाही आणि आपण दु ख कशाचे करतो हेहि ओळखता येत नाही, तेव्हा समजावे की आपण स्वाभाविकपणें वाढीस लागलो आहोत, आणि आपली भूमिका दिवसेंदिवस उन्नत होत आहे

## ३९

मनुष्य जेव्हा ध्येयमत्त होतो, तेव्हा त्याला त्याचा पुसट आविष्कार देखील वारुणीसारखा मादक वाटू लागतो

## ४०

तुम्ही मद्य पिता ते नशा चढावी म्हणून पिता. आणि मी पितो तें त्या दुसऱ्या वारुणीचा मद थोडासा उतरावा म्हणून पितो.

## ४१

माझा प्याला जेव्हा रिकामा होतो, तेव्हा मी स्वत चे समाधान मानून घेतो तो अर्धा भरलेला असतो तेव्हा मात्र मला ते सहन होत नाही

## ४२

एखादा मनुष्य जेव्हा आत्मपरिचय करून देण्यासाठी तुमच्याशी बोलतो, तेव्हा त्याचें खरें अतरग तो जें बोलतो त्यात प्रतिबिंबित न होता तो जें बोलू शकत नाही त्यातच व्यक्त होते

म्हणून जर एखाद्याला नीट ओळखावयाचे असेल तर तो काय म्हणतो याकडे लक्ष देण्यापेक्षा तो काय म्हणत नाही याच्याकडे अधिक लक्ष द्या

## ४३

मी जे बोलतो त्यापैकी अर्धे अर्थविहीन असतें पण तें बोलावें लागतें, कारण त्याच्या मदतीनेच बाकीचें अर्धे तुम्हाला समजणार

## ४४

विनोदी किंवा खुश-मिजाज वृत्ति म्हणजे प्रमाण ओळखण्याची शक्ति

*            *            *

एखाद्या प्रसगाची विनोदी बाजू पाहता येणें म्हणजे जीवनातील निरनिराळ्या बाजूचें प्रमाण ओळखणें आहे

*            *            *

ज्याला जीवनातील प्रसगातले तारतम्य समजलें तो कसल्या-हि प्रसगात आपली प्रसन्नता तरगत ठेवावयाचाच

४५

जेव्हा लोकानी माझ्या वाचाळ दोषाची स्तुति चालवली आणि माझ्या मूक सद्गुणाची हेटाळणी सुरु केली तेव्हा माझ्यामध्ये एकाकिता उत्पन्न झाली

४६

जेव्हा जीवनाला आपले हृदय गाणारा गायक (कवि) मिळत नाही तेव्हा लाचारीने ते आपले मन बोलून दाखविणारा तत्वज्ञ निर्माण करतें

४७

सत्याला अखंड ओळखावें, शब्दबद्ध क्वचित् क्वचित् करावे
[ चर्चेच्या खोड्यात मात्र त्याला कवीच घालू नये ]

४८

आपल्यातील जें खरें असतें तें निस्तब्ध असतें जे जोडलेलें असतें तेंच वाचाळ असतें

४९

माझी जीवन-वाणी तुझ्या जीवन-श्रुतीपर्यंत कधीहि पोहोचणार नाही तरी आपल्याला एकाकी वाटू नये म्हणून आपण बोलू या झाले

५०

जेव्हा दोन स्त्रिया बोलत असतात तेव्हा त्याचें बोलणें वायफळच असतें जेव्हा एकच स्त्री बोलू लागते तेव्हा मात्र ती आपलें जीवन-सर्वस्व व्यक्त करते

५१

बेडकाची डरकणी बैलापेक्षा मोठी असली म्हणून काय झालें, त्याला नागर थोडाच खेंचता येणार, किंवा अुसाचा चरक फिरविता येणार ? त्याच्या चामड्याचे जोडे देखील होअू शकत नाहीत

५२

जे जन्माचे मुके असतात त्यानाच वाचाळाचा हेवा वाटतो

५३

जर हिवाळ्यानें म्हटले की, "वसंत माझ्या हृदयात साठवलेला आहे", तर लोकाना ते कधी खरें वाटेल का ?

५४

प्रत्येक बीज म्हणजे अेक अुत्कट वासनाच होय

*　　　　*　　　　*

प्रत्येक बीज म्हणजे विप्रलंभच नव्हे का ?

५५

जर खरोखर डोळे अुघडून पाहाल तर सर्व चेहऱ्यात तुम्हाला तुमचा स्वतःचाच चेहरा दिसेल

आणि जर खरोखर आपले कान अुघडून अैकाल तर सर्व आवाजात तुमचा स्वतःचाच आवाज तुम्हाला अैकू येअील

५६

सत्याचा शोध करायला दोघेजण लागतात अेकाने सत्याचा अुच्चार करावा आणि दुसऱ्याने ते समजून घ्यावे

## ५७

शब्दाच्या लाटा आपणावर अखंड अुठत असल्या तरी आपला तळ नेहमी निःशब्दच असतो

## ५८

किती तरी सिद्धांत, किती तरी धर्मतत्त्वे, खिडकीच्या तावदानासारखी असतात त्यातून सत्य जरी दिसत असले तरी सत्यापर्यंत पोचण्याच्या बाबतीत ती आडच येतात

## ५९

चल, आपण लपंडाव खेळू या पण तो खेळणार कसा? तू माझ्या हृदयात लपून राहिलास तर तुला शोधून काढणे मुळीच कठीण नाही पण जर तू स्वतःच्या कवचाच्या मागेच लपलास तर तुला शोधून काढण्यात होशील काय?

## ६०

पुष्कळदा स्त्रिया आपल्या स्मिताचा बुरखा धारण करून आपला चेहरा लपवितात

*　　　*　　　*

पुष्कळदा स्त्रियांना आपला भाव लपविण्यासाठी अेका स्मिताचा बुरखा बस होतो

## ६१

आनंदी लोकांबरोबर आनंदाचे गाणे गाणाऱ्या दुःखी हृदयाचा थोरपणा खरोखर अलौकिक असतो

## ६२

स्त्री-हृदय समजण्याची जो हाव बाळगतो, कवीच्या प्रतिभेचे पृथक्करण, करण्याची जो हिंमत धरतो आणि मौनाचे गूढ अुकलण्याचा जो प्रयत्न करतो — असा मनुष्य न्याहारी करण्यासाठी गोड स्वप्नातून देखील अुठून बसावयाचा।

## ६३

मिरवणुकीत चालणाऱ्या लोकांबरोबर चालणें आपल्याला पत्करले पण मिरवणूक जाताना पाहण्यासाठी रस्त्याच्या बाजूनें अुभे राहणाऱ्या तमासगिरांबरोबर तिष्ठत राहणें आपल्याला मुळीच परवडणार नाही

## ६४

जो तुमची सेवा करतो त्याला धन देअून त्याचे अुतराअी होणे शक्य नसते अैपत असेल तर त्याला तुमचे हृदय द्या नाही तर [निदान] त्याची [निर्व्याज पण सव्याज] सेवा करा.

## ६५

आपले जीवन व्यर्थ झाले असें कसे म्हणता येअील? लोकांनी आपल्या हाडांचे मिनारे नाही का बांधले?

## ६६

पक्षाची किंवा पयाची भूमिका स्वीकारणें बरोबर नाही कवीचे मन आणि विंचवाची नांगी अेकाच भूमिकेवरून (जमिनीवरून) डौलदारपणाने वर अुठत असतात

६७

प्रत्येक दक्ष प्रजापति आपल्याला मारणाऱ्या वीरभद्राला अुत्पन्न करीत असतोच

*                *                *

प्रत्येक हिरण्यकश्यपूला आपली आतडी फाडून काढणारा नरसिंह खांबातून लाथ मारून काढण्याची बुद्धि होते

६८

झाडे म्हणजे पृथ्वीनें आकाशपटलावर लिहिलेल्या कविताच होत आपण तीच झाडें तोडून त्याचा कागद बनवतो आणि त्यावर लिहितो काय ? — तर मानवी कल्पनाचें दिवाळे

६९

काही लिहावें असे जर तुला वाटत असेल का लिहावे हें केवळ सतानाच ठाअूक असते तर तुजजवळ ज्ञान, कला आणि जादू तीन्ही असली पाहिजेत शब्दांत लपून असलेल्या संगीताचें ज्ञान, कलेची कृत्रिमता टाळण्याची कला आणि आपल्या वाचकावर प्रेम करण्याची जादू ही तीन्ही असली पाहिजेत

७०

हे लोक आपल्या लेखण्या आमच्या हृदयात बुडवतात आणि समजतात की त्याचे लिखाण अीश्वर-प्रेरित आहे

७१

झाड जर आत्मचरित्र लिहावयास बसले तर तें अेगदी वंशवृत्ता-सारखें मोठें पुराणच व्हावयाचें

७२

'तुला कविता लिहिण्याची शक्ति हवी आहे की न लिहिल्या जाणाऱ्या काव्याची मस्ती हवी आहे?' असे जर मला कुणी विचारले, तर मी आपला मस्तीच पसंत करीन कारण तें श्रेष्ठ काव्य असते

पण तुमचें आणि माझ्या सर्व शेजाऱ्यांचे अेकमत आहे की मला कधीच बरोबर पसंती करता येत नाही

७३

कविता म्हणजे काही व्यक्त केलेला अभिप्राय नव्हे कविता म्हणजे मळमळ वाहणाऱ्या जखमेंतून किंवा हसऱ्या तोंडातून अुद्भवणारें मंजुळ गीत होय

७४

शब्द कालातीत असतात जेव्हा जेव्हा आपण शब्द बोलतो किंवा लिहितो तेव्हा शब्दांचें हें सनातनत्व ध्यानात धरूनच तसें करावें

७५

कवि म्हणजे सिंहासनावरून काढून टाकलेला आणि आपल्याच राजवाड्याच्या राखेतून अेक मूर्ति तयार करण्याचा प्रयत्न करणारा राजा होय

* * *

कवि म्हणजे आपल्याच राजवाड्याच्या राखेंतून अेक मूर्ति बनवू पाहणारा पदच्युत राजा होय

७६

कविता म्हणजे आनंद, दुःख आणि आश्चर्याची मिसळ होय त्याला शब्दकोशाची थोडीशी फोडणी दिलेली असते अेवढेंच

७७

कवीनें आपल्या हृदयस्वामिनी कवितेच्या जन्मदात्री मातेचा शोध करणें व्यर्थ होय

७८

अेकदा मी अेका कवीला म्हणालो की, "तुमचा जीवमान असेतोपर्यंत तुमची योग्यता आम्हाला समजणार नाही"

त्यानें अुत्तर दिलें "होय गुप्त गोष्टी प्रगट करण्याची शक्ति मृत्यूच्या ठिकाणीच असते माझी योग्यता जाणायची असेल, तर ती हीच की माझ्या वाणीतून व्यक्त होतें त्याहून माझ्या हृदयात अधिक साठवलेले आहे आणि माझ्या हातात दिसते त्यापेक्षा माझ्या अिच्छाशक्तीत अधिक भरलेलें आहे"

७९

जर तुम्ही वैराण वाळवटाच्या मध्यभागी सौंदर्याचें गान अेकट्यानेंच सुरू केलें, तरी तेथेंहि तुम्हाला श्रोते मिळतील

८०

कविता म्हणजे हृदयाला भारून टाकणारें शहाणपण.
शहाणपण म्हणजे मनाला गुंगवणारी कविता

जर आपल्याला मनुष्याच्या हृदयाला भारून टाकता येईल आणि त्याबरोबर त्याच्या मनात (बुद्धीत) संगीताचा प्रवेश करविता येईल तर

खरोखर तो ईश्वराच्या सान्निध्यापर्यंत पोहोचू शकेल.

८१

प्रेरणा नेहमी गात असते, ती विवरण कधीच करीत नाही. ते तिचें काम नव्हे.

८२

पुष्कळदा आपण लहान मुलाच्यासाठी म्हणून अंगाईगीते गातो पण वस्तुत गातो स्वतःलाच झोप लागावी म्हणून

८३

आपले शब्द म्हणजे मानसिक मेजवानीच्या प्रसंगी हातातून पडणारे अन्नाचे केवळ कणच होत

८४

बुद्धीचा व्यापार म्हणजे कवितेच्या प्रवाहातील धोंडच होय.

८५

कविवर तोच की जो तुमच्या आमच्या मौनाला गातो

८६

अन्नानें तोंड भरलेलें असेल तेव्हा तुम्ही गाणार कसें?

आणि मूठ जर सोन्याने भरलेली असली तर तुम्ही आशीर्वादासाठी हात वर तरी कसा करणार?

चडोल पक्षी आपले प्रेमगीत गातो तेव्हा, म्हणे, काट्याने आपल्या अुराला जखम करून घेतो

आपण सर्व असेंच करतो नाही तर आपण गाणार तरी कसे ?

८८

प्रतिभावान व्यक्ति म्हणजे हळूहळू खुरणाऱ्या वनताऱ्या प्रारंभीचें कोकिलगान होय

८९

अगदी आकाशापर्यंत भराऱ्या मारणाऱ्या द्विजाला देखील शेवटी जमिनीवर अुतरल्याखेरीज गत्यतर नसते

९०

पागल मनुष्य तुमच्या माझ्याहून काही कमी प्रतीचा संगीतकार नसतो फरक अेवढाच की त्याचे हातचें वाद्य काहीसें वेसूर असतें

९१

मातेच्या हृदयात जें गीत मूकपणे निजलेले असतें तें तिच्या लाडक्याच्या तोडाने गाअू लागतें

९२

कोणताहि संकल्प आजवर वाया गेला नाही.

[ मनात आलेला कोणताहि हेतू, मनात अुठलेली कोणतीहि वासना कोणत्या ना कोणत्या रूपानें सफळ होणारच ]

*  *  *

[ कोणत्याहि हाकेला ओ ही मिळावयाचीच ]

९३

माझें आणि माझ्या अंतरात्म्याचे पूर्ण एकमत कधीच झाले नाही खरी गोष्ट आमच्या दोघांच्या मध्येंच कुठेतरी असली पाहिजे-

९४

तुमचा आत्माराम तुमची स्थिति पाहून नेहमीच दुखी कष्टी असतो पण दुख हेंच आत्मारामाचे अन्न असल्यामुळें त्या आहारावर तो पुष्ट होतो. तेंव्हा हळहळण्याचे कारण नाही

९५

ज्याचे आत्मे निद्रिस्त आहेत, आणि ज्याचे देह अस्वस्थ बेसूर आहेत, अशाची गोष्ट वगळल्यास आत्मा आणि शरीर याच्यामध्यें अदावत किंवा गजग्राह असण्याचे कारणच नाही

९६

जेंव्हा तुम्ही जीवनाच्या हृदयापर्यंत पोहचाल—जीवनाच्या गाभ्यापर्यंत जाल—तेंव्हा तुम्हाला सर्वत्र सौंदर्यच सौंदर्य आढळून येईल सौंदर्याची ओळख नसलेल्या आंधळ्या डोळ्यात देखील तुम्ही सौंदर्य पाहू शकाल

९७

सौंदर्याचा आपण शोध करतो तेवढेंच खरे जीवन होय-बाकी सर्व तिष्ठत बसण्याचेच प्रकार होत

९८

जमिनीत बी पेरा, ती तुम्हाला पुष्प अर्पण करील-आकाशामध्ये तुमचें एखादें स्वप्न सोडा म्हणज ते तुम्हाला तुमची प्रिया आणून देईल

ज्या दिवशी तुम्ही जन्मला त्या दिवशीच सैतान वारला

आता अेखाद्या देवदूताला भेटण्यासाठी तुम्हाला नरकातून पसार होण्याची जरूर नाही

१००

कितीतरी स्त्रिया पुरुषाचे हृदय मागून घेतात, पण ते आपलेसे करणें फारच थोड्यांना साधते

१०१

मालक व्हावयाचें असेल तर मालकीहक्क मागू नका.

*

आपलेसें करावयाचे असेल तर आपला अधिकार मागू नका

१०२

जेव्हा पुरुषाचा हात स्त्रीच्या हाताला स्पर्श करतो, तेव्हा ती दोघे अनंताच्या हृदयाला स्पर्श करतात

१०३

प्रेम म्हणजे दोघां प्रेमिकांच्या मधील पडदा होय

१०४

प्रत्येक पुरुषाचे दोन स्त्रियांवर प्रेम असते त्यातील पहिली त्याची कल्पनामूर्ति असते आणि दुसरी या जगात अजून आलेलीच नसते

१०५

ज्या पुरुषाना स्त्रियाचे अल्पस्वल्प दोष पोटात घालता येत नाहीत त्याना त्याच्या थोर सद्गुणाचा आस्वाद कधीच घेता येणार नाही

१०६

जे प्रेम रोजच्या रोज ताजेतवाने होत नाही ते लवकरच केवळ अेक जड सवय होअून बसते, आणि अखेर ती सवय देखील गुलामीचे रूप धारण करते

१०७

प्रेमी लोक अेकमेकाना आलिंगन देण्याच्या अैवजी दोघाच्या आड येणाऱ्या वस्तूलाच आलिंगन देत बसतात

१०८

प्रेम आणि शका याच्या मध्ये हस्तीदती ओळख देखील नसते

* * *

प्रेम आणि वहीम अेकमेकाला परकेच राहिलेले आहेत

१०९

प्रेम म्हणजे प्रकाशाच्या पानावर प्रकाशाच्या हाताने लिहिलेला प्रकाशाचा शब्द होय

११०

मैत्री ही केव्हाहि साधावयाची सधि नसून नेहमीच ओळखावयाची अेक गोड जबाबदारी आहे

## १११

कोणत्याहि परिस्थितीत जर तुमचा तुमच्या मित्रावर विश्वास बसू शकला नाही, तर तुम्ही त्याला कधीच ओळखू शकणार नाही

## ११२

तुमचा उत्तमातला उत्तम पोशाख इतर लोकांनीच विणलेला असतो [ तुमची अतिशय उंची वस्त्रें इतरांनीच तुम्हाला भेट दिलेली असतात ]

तुम्ही सर्वोत्कृष्ट मिष्टान्न खाता तें लोकांनी दिलेल्या मेजवानीच्या वेळीच

तुम्हाला परांच्या गादीवर निजावयास मिळते ते देखील कोणाच्या घरी पाहुणे म्हणून जाता तेव्हाच

तेव्हा आता सांगा पाहू, तुम्ही स्वतःला इतरांपासून वेगळे कसें करणार ?

[ कितीहि उत्कृष्ट गायक असेना का, दुसऱ्यांनी वाहवा म्हटल्याशिवाय त्याची तृप्ति होत नाही

स्वतःच्या योग्यतेची स्वतःला कितीहि जाणीव असली तरी दुसऱ्यांनी कदर केल्यानंतरच आपल्याला समाधान वाटते

आपलें सौंदर्य आरशात उमटलेलें पाहून आपल्याला जितका आनंद होतो त्यापेक्षा दुसऱ्याच्या डोळ्यांत ते उमटलेलें पाहून जास्त होतो ]

## ११३

तुमची बुद्धि आणि माझें हृदय याचें जर अेकमत व्हावयाचे असेल तर तुमच्या बुद्धीनें संख्येच्या जगात राहावयाचे आणि माझ्या हृदयानें अैक्याच्या जगात राहावयाचे सोडून दिले पाहिजे

## ११४

जोपर्यंत आपण आपल्या भाषेतील शब्दसंख्या कमी करून हातावर आणून ठेवली नाही तोपर्यंत आपल्याला अेकमेकाचे म्हणणे कधीच कळावयाचे नाही

## ११५

लाखेच्या मोहोरेने बंद केलेले हृदय अुघडावयाचे म्हणजे तोडण्याखेरीज अुपाय काय ?

## ११६

महान् दुःख किंवा महान् आनंद याच्या द्वाराच तुमचे रहस्य अुघडें होअू शकेल ।

आत्मपरिचय द्यावयाचा असेल, हृदयाविष्करण करावयाचे असेल, तर दिगम्बर होअून अुन्हात नाचलें पाहिजे किंवा [येशूप्रमाणे] आपला क्रॉस आपणच स्वतःच्या खांद्यावर अुचलून नेला पाहिजे

## ११७

संतोष आणि समाधानाच्या ज्या गोष्टी आपण करतो, तिकडे जर निसर्गानें लक्ष दिलें तर अेकहि नदी समुद्राकडे वाहत जाणार

नाही, आणि हिवाळा कधी वसंताचे रूप धारण करणार नाही आपण काटकसरीसबबानें जें काही बोलतो ते जर निसर्गानें अैकलें तर आपल्यापैकी किती लोकांना ही हवा पोटात घ्यावयास मिळेल ?

## ११८

सूर्याकडे पाठ फिरवली म्हणजे तुम्हाला तुमची छायाच दिसणार

## ११९

दिवसाच्या प्रकाशात तुम्ही मोकळे आहात आणि रात्रीच्या ताराप्रकाशातहि तुम्ही मोकळे आहात

आणि जेव्हा अूनहि नसते, चांदणेंहि नसते आणि ताऱ्यांचाहि प्रकाश नसतो तेव्हा देखील तुम्ही मोकळेच असता

आणि जेव्हा या सर्व विश्वाकडे पाहण्याचें सोडून देअून तुम्ही डोळे झाकता तेव्हा देखील तुम्ही मोकळेच असता

परंतु जेव्हा तुम्ही अेखाद्यावर प्रेम करता तेव्हा तुमच्या प्रेमामुळेंच तुम्ही त्याचे गुलाम होता,

आणि जेव्हा कोणी तुमच्यावर प्रेम करतो तेव्हा त्याच्या त्या प्रेमामुळें देखील तुम्ही त्याचे गुलाम बनता

## १२०

आपण सर्व मंदिराच्या महाद्वारावर अुभे असलेले भिकारी आहोत महाराज जेव्हा जेव्हा मंदिरात जातात किंवा मंदिरातून बाहेर पडतात तेव्हा तेव्हा त्यांनी अुदारपणें दिलेल्या दानाचा हिस्सा आपल्याला मिळतो

पण आपण सर्वजण अेकमेकाचा हेवा करतो, राजाकडे कमी-पणा आणण्याचाच तो अेक प्रकार आहे

## १२१

भुकेहून अधिक खावयाचा तुम्हाला अधिकारच नाही अर्धी भाकर तर दुसऱ्यासाठीच असते आणि घरात अचानक येणाऱ्या अतिथि-अभ्यागतासाठी अेकादा तुकडा अुरवला पाहिजेच

## १२२

अतिथि-अभ्यागत आणि पाहुणे जर कधी घरी आले नाहीत तर मगळ्या घरांना कडप्याची कळा यावयाची

## १२३

अेका मेहेरबान लाडग्याने अेका सरळ मेंढरास म्हटले, "तुम्ही आमच्या घरी येअून आमच्यावर अनुग्रह नाही का करणार?"

मेंढराने अुत्तर दिले, "तुमच्या घरी येण्यानें आमच्यावरच अनुग्रह झाला असता, पण तेथून तुमच्या पोटात पोहोचावें लागते अेवढीच काय ती अडचण आहे"

## १२४

घरी येणाऱ्या पाहुण्याला अुंबरठ्यावरच थांबवून मी म्हटले, "अहो, आत येताना पायाची धूळ अशी झाडू नका परत जाताना खुशाल झाडा"

## १२५

तुमच्यापेक्षा मला ज्या वस्तूची अधिक जरूर आहे ती तुम्ही मला देण्यात काही तुमची अुदारता नाही, पण माझ्यापेक्षा तुम्हालाच

ज्या वस्तूची गरज अधिक असेल अशी वस्तू तुम्ही मला द्याल तेव्हाच तुम्ही खरे अुदार म्हणवावयाचे

१२६

जेव्हा तुम्ही देता, आणि देत असताना, घेणाऱ्याच्या चेहऱ्यावरील सकोच आपल्या नजरेस पडू नये म्हणून तोंड फिरविता तेव्हाच तुम्हाला खरे दानी म्हणता येईल

१२७

सर्वात मोठा श्रीमंत आणि सर्वात मोठा गरीब यांच्यामधील अतर फक्त अेका दिवसाची भूक आणि अेका तासाची तहान अेवढेच असते

१२८

पुष्कळदा आपण "काल"कडून घेतलेले कर्ज चुकविण्यासाठी 'अुद्या"कडून अुसनें घेतो

१२९

मला देखील देवदूत आणि सैतानदूत येअून गाठतात पण त्याना टाळण्याची युक्ति माझ्या जवळ आहे

जेव्हा कोणी देवदूत मजकडे येतो तेव्हा मी अेखादे जुने, शिळे, तुरसें स्तोत्र म्हणू लागतो म्हणजे तो कटाळून लागलाच निघून जातो

आणि जेव्हा अेखादा सैतानाचा साथी माझ्याजवळ येतो, तेव्हा मी अेखादें जुनें, शिळें, तुरसें पाप करतो म्हणजे लागलाच तोहि तेथून पोबारा करतो

## १३०

हा तुरुंग तसा काही वाओीट नाही पण माझ्या आणि शेजारच्या कैद्याच्या कोठडीमध्ये ही जी भिंत आहे ती मला आवडत नाही

तरी तुम्हाला मी खात्रीपूर्वक सांगतो की वार्डरचा किंवा तुरुंग बांधणाऱ्याचा मी मुळीच दोष काढू अिच्छीत नाही

[ तुरुंग म्हणजे शरीर, शेजारी म्हणजे दुसरा कोणीहि मनुष्य, वार्डर म्हणजे समाज, आणि तुरुंग बांधणारा तो अीश्वर ]

## १३१

तुम्ही खाण्यासाठी मासा मागितला असतांना जे तुम्हाला साप देतात त्याच्याजवळ कदाचित् द्यायला सापाहून दुसरें काहीच नसेल आणि तसेच जर खरोखर असेल तर त्याच्या बाबतीत ती अुदारताच म्हटली पाहिजे

## १३२

शिताफीचें किंवा लबाडीचे साधते केव्हा केव्हा, पण तिला आत्महत्या करावी लागते नेहमीच

## १३३

जे कुणाचेहि रक्त सांडीत नाहीत अशा खुनी लोकांना, जे कधी चोरी करीत नाहीत अशा चोरांना, आणि जे कधीच खोटें बोलत नाहीत अशा लबाडांना क्षमा कराल तेव्हाच तुम्हाला मी खरे क्षमावान म्हणेन

## १३४

वरें कोठे संपलें आणि वाओीट कुठें सुरु झालें याच्यावर ज्याला नेमकें वोट ठेवता येओील त्याला ओीश्वराच्या चरणाचा स्पर्शहि करतां येओील

## १३५

तुमचे हृदय जर ज्वालामुखी असेल तर तुमच्या हाती फुलें कशी ओुमलणार ?

## १३६

कसली विचित्र हौस !

केव्हा केव्हा मला वाटते की लोकांनी आपल्याला फसवावें आणि वुडवावें. तसें झालें म्हणजे आपण कसे फसले गेलो किंवा वुडालो अेवढें देखील या वावळटाला समजत नाही असें मानणाऱ्या त्या लोकांना मनातल्या मनात मला हसता येओील !

## १३७

शिकारी जेव्हा स्वत च श्वापद होओून जिवानिशी धावण्याचे ढोंग करतो तेव्हा त्याला काय म्हणू !

## १३८

आपले अस्वच्छ हात तुमच्या ओुपरण्याला पुसणाऱ्याला तुमचे ओुपरणें देओून टाका कदाचित् त्याला त्याची गरज पुन पडावयाची तुम्हाला तशी पडणार नाही

## १४३

मनुष्य स्वत वरून दुसऱ्याची पारख करीत असतो.

तेव्हां आता सांगा, "आपल्यापैकी दोषी कोण आणि निर्दोष कोण ?"

## १४४

तुमच्या अपराधाचा अर्धा दोष जो सहानुभूतिपूर्वक स्वत कडेच लावून घेतो तोच खरा न्यायी होय

*  *  *

खरा न्यायी तोच की जो तुम्हाला अपराधी ठरविताना जणू काय स्वत च त्या गुन्ह्याचे वाटेकरी आहोत असें समजून अर्धमेला होतो

## १४५

निर्बुद्ध आणि धीमान् दोघेच काय ते मनुष्यकृत कायदे मोडतात आणि म्हणूनच दोघेहि "देवाना प्रिय" होत

## १४६

तुमचा जेव्हा पाठलाग होतो तेव्हाच तुमच्या पायात वेग येतो

## १४७

मला कोणी शत्रु नाही पण देवा, जर मला शत्रु देणारच असशील तर त्याची आणि माझी शक्ति अगदी सारखी तुल्यबळ असू दे, म्हणजे आमच्या दोघाच्या युद्धात सत्याचाच जय होईल.

## १४८

आपल्या शत्रूशी आपलें सख्य केव्हा होतें ? दोघेहि मेल्यावर !

*                    *                    *

तुम्ही आणि तुमचा वैरी दोघेहि जेव्हा मराल तेव्हा तुमची गट्टी जमेल

[ मरणान्तानि वैराणि । ]

## १४९

मनुष्य अेखादे वेळी आत्मरक्षणासाठीच आत्महत्या करावयाचा

## १५०

फार प्राचीन काळी अेका माणसाला तो अतिशय प्रेमळ व गोड आहे म्हणून क्रूसावर चढवण्यात आलें होतें

आणि आश्चर्य हें की तो मला काल तीनदा भेटला

पहिल्यादा दिसला तेव्हा तो अेका पोलिसाला 'या वेश्येला तुरुंगात नेअू नका' असें विनवीत होता, दुसऱ्यादा दिसला तेव्हा तो अेका बहिष्कृताबरोबर बसून रसपान करीत होता, आणि तिसऱ्यादा दिसला तेव्हा चर्चमध्ये कपन्याचे शेअर्स विकणाऱ्याला गुद्दे मारीत होता

## १५१

पापपुण्याविषयी लोक म्हणतात ते सर्व जर खरें असेल तर माझें जीवन म्हणजे अखंड पापच आहे

कीव म्हणजे अर्धा न्याय

## १५३

माझ्याशी फक्त अेकच अिसम अन्यायानें वागला आणि तो म्हणजे ज्याच्या भावाशी मी अन्यायानें वागलो होतो तो.

## १५४

अेखाद्या मनुष्याला पकडून तुरुंगात घालीत असताना पाहाल तेव्हा मनात असें म्हणत जा की, "कदाचित् अशा रीतीनें तो याच्याहून अधिक धिकार तुरुंगातून स्वतःला वाचवीत आहे"

आणि जेव्हा अेखाद्याला तुम्ही दारू पिअून झिंगताना पाहाल, तेव्हा मनात् म्हणा, "अशा रीतीनें तो याहून मोठ्या अोंगळपणातून स्वतःला वाचवीत आहे"

## १५५

पुष्कळदा मी आत्मरक्षणार्थ दुसऱ्याचा द्वेष केला आहे, पण जर मी अधिक सामर्थ्यवान असतो तर असलें हत्यार मी कधीच वापरलें नसते

## १५६

डोळ्यातल्या द्वेषाला अोठावरील हास्याचे ठिगळ लावू पाहणारा मूर्खच म्हटला पाहिजे

*　　　　*　　　　*

अोठावरील हास्यानें डोळ्यातील द्वेष लपवू पाहणारा अगदीच वेअक्कल असला पाहिजे

## १५७

जे लोक माझ्याहून लहान आहेत तेच माझा हेवा किंवा द्वेष करणार.

आजवर माझा कोणीच हेवा किंवा द्वेष केला नाही अर्थात मी कोणाहूनहि मोठा नाही

जे माझ्याहून मोठे असतील तेच माझी वाखाणणी किंवा हेटाळणी करणार

'आजवर कोणीच माझी वाखाणणी किंवा हेटाळणी केली नाही अर्थात मी कोणाहूनहि लहान नाही

## १५८

"मी तुला समजूच शकत नाही" असें तुम्ही मला म्हणणें यात माझा योग्यतेहून मोठा बहुमान आहे, आणि तुमचा स्वतःचा विनाकारण अपमान आहे

## १५९

जीवनाकडून मला सोनें मिळत असता, मी तुम्हाला चांदी देण्यात खरोखर माझा किती कजूषपणा आहे! आणि तरी सुद्धा मला वाटतें की आपण मोठे कर्ण आहोत!

## १६०

जेव्हां जीवनाचे हार्द तुम्हाला सांपडेल तेव्हा तुम्हाला दिसून येईल कीं तुम्ही आततायाहून श्रेष्ठ नाही आणि अवतारी पुरुषाहून कनिष्ठ नाही

*                    *                    *

जेव्हा जीवनाचे हार्द तुम्हाला उमगून येईल तेव्हा, तुम्हाला दिसेल की आपण एखाद्या पापात्म्याहून किंवा घातक्याहून श्रेष्ठ नाही, तसेंच पुण्यात्म्या युगपुरुषाहून कनिष्ठ नाही

१६१

केवढें आश्चर्य की एखाद्या मदगतीची तुम्हाला दया वाटते, पण मदबुद्धीची करुणा येत नाही

आणि डोळ्यांनी अंध असलेल्याचा तुम्हाला कळवळा येतो तसा हृदयानें अंध असलेल्याचा येत नाही

१६२

लगडयानें शत्रूच्या टाळक्यावर हाणून स्वत च्या कुबडया मोडून घेणें शहाणपणाचे काम नव्हे

१६३

आपल्या खिशातून काढून देऊन दुसऱ्याच्या हृदयातून काढून घेऊं पाहणारा आवळाच म्हटला पाहिजे

१६४

जीवन ही एक मिरवणूक आहे मदगति मनुष्याला तिची घाई झेपत नाही म्हणून तो बाजूला सरतो,

आणि द्रुतगति त्याच सधाचा चेंगटपणा पाहून कटाळतो व तोहि बाहेर पडतो

१६५

पाप म्हणून जगात काही वस्तु असेल तर आपल्यापैकी कित्येक लोक मार्गे पाहून पूर्वजाचे अनुकरण करून ते करतात

आणि आपल्यापैकी कित्येक जण पुढच्या पिढीविरुद्ध, त्याच्या-वर वधनें घालून ते करतात

१६६

खरा सज्जन तोच की जो दुर्जन समजल्या जाणाऱ्या सर्वच लोकांशी अगदी अेकजीव होअून जातो

१६७

आपण सगळेच कैदी आहो फरक अेवढाच की काहीच्या कोठ-ड्यांना खिडक्या आहेत आणि काहींच्यांना नाहींत

१६८

आपण सर्व आपल्या हक्काचा (सत्कृत्याचा) बचाव करतो त्याहून अधिक निकरानें किंवा त्वेषानें आपल्या चुकाचा बचाव करतो, हे केवढें आश्चर्य!

१६९

आपण सर्वजण जर अेकमेकाजवळ आपआपल्या पापाचा पाढा वाचू लागलो तर कोणातच काही नाविन्य नाही असें दिसून सर्वजण पोट धरधरून हसू.

[नवीन पापें शोधून काढण्याअितकी प्रतिभा कोणात असेल, तर ना?]

आणि जर आपण आपआपले सद्गुण अेकमेकाला सांगावयाचे ठरविलें तरी देखील वरच्याच कारणामुळें आपल्याला हसू लोटेल

१७०

अेखाद्यानें जोवर रूढीचे अुल्लंघन केलें नाही तोवर त्याला धर्माचें अुल्लंघन करण्यास हरकत नाही

*　　　　*　　　　*

मनुष्यकृत शिष्टाचाराविरुद्ध जोपर्यंत अेखाद्यानें काही अपराध केला नाही तोपर्यंत मनुष्यकृत कायद्याचे बंधनहि त्याला लागू पडत नाही

पण जेव्हा तसा अपराध त्याच्या हातून घडतो तेव्हा तो सामान्य कोटीत येअून बसतो.

१७१

सरकार म्हणजे काय? तर तुमच्यामाझ्यामधील अैकमत्य. पण पुष्कळदा आपणा दोघांचीहि चूक होत असते.

*　　　　*　　　　*

सरकार म्हणजे तुमच्यामाझ्यामधील करार पण पुष्कळदां आपण दोघेहि भलत्याच मार्गावर असतो

१७२

अपराध किंवा गुन्हा हा पुष्कळ वेळां गरजेचे अेक दुसरें नावच असते किंवा अेखाद्या रोगाचे दुसरें रूप असते

*　　　　*　　　　*

[गुनाह या तो किसी गर्ज़का दूसरा नाम होता है या किसी मर्ज़का दूसरा रूप होता है।]

१७३

दुसऱ्याच्या दोषाची अेकसारखी जाणीव असणें याहून मोठा दोष असू शकेल का?

## १७४

एखादा इसम जर तुम्हाला हसला तर तुम्ही त्याची दया करू शकता; पण तुम्हीच जर एखाद्याला हसलात तर तुम्हाला स्वत:ची कधीच क्षमा करता यावयाची नाही

जर दुसऱ्यानें तुम्हीस इजा केली तर ती विसरून जाणें तुम्हाला शक्य आहे, पण तुम्ही जर दुसऱ्याला इजा केलीत तर त्याचे स्मरण तुम्हाला सतत खात राहणार

खरोखर पाहता दुसरा मनुष्य म्हणजे दुसरा देह धारण करणारें तुमचे स्वत:चेच कोमल हृदय होय.

## १७५

लोकांनी तुमच्या पंखानी उडावें अशी तुमची अपेक्षा असते पण स्वत: तुम्ही त्याना आपलें एक पीससुद्धा काढून देऊ शकत नाही!

## १७६

एकदा एक इसम माझ्या घरी येऊन फुकटचे खाऊन पिऊन गेला आणि वर मला हसू लागला.

पुन्हा जेव्हा तो त्याच इराद्यानें आला तेव्हा मी त्याला काढून लावलें;

ते पाहून स्वर्गातील देवदूत मला हसू लागले!

## १७७

द्वेष? द्वेष म्हणजे एक सडणारा मुडदा. त्याला पोटात बाळगणारे थडगें बनण्याची कोणाची तयारी आहे?

## १७८

ज्याचा खून झाला तो स्वत खुनी वनला नाही यात त्याचा थोरपणा आहे

## १७९

पचपरमेश्वर, जनतेच्या वाचाळ मनात वसत नसून तिच्या मूक हृदयात वसत असतो

## १८०

- पैसे घेऊन माझा वेळ मी विकीत नाही म्हणून लोक मला वेडा समजतात,

आणि ते माझ्या वेळेची किमत ठरवू पाहतात म्हणून मी त्याना वेडे समजतो

## १८१

लोक आमच्यापुढें सोनें, चादी, चदन आणि हस्तीदताचे वैभव माडतात, आणि आम्ही त्यांच्यापुढें आमचें हृदय व आमचा जीव नैवेद्य म्हणून ठेवतो,

आणि तरी सुद्धा ते स्वतला यजमान समजतात, व• आम्हाला मेहमान (पाहुणे) समजतात

*　　　*　　　*

[ लोक आम्हाला आपल्या सपत्तीचा अहेर करतात आणि आम्ही त्याना आमचे हृदय व आमचा जीव काढून देतो तरी सुद्धा तेच यजमान का, व आम्ही पाहुणे कसे? ]

## १८२

ज्याला कसलीच अिच्छा नाही, कसलेच मनोरथ नाहीत असा महात्मा होण्यापेक्षा ज्याला थोरपणाची स्वप्नें पडतात व ती खरी करण्याची ज्याला अदम्य वासना आहे असा सामान्य जीव झालेलें मला अधिक आवडेल

[कोरड्या थोरपण पेक्षा, पुरुषार्थी जिवतपणाचा ओलावा असलेला लहानपणा पत्करला ]

## १८३

आपल्या स्वप्नाचे आणि मनोरथाचे जो पैसे करू पाहतो, त्याचेहून अधिक कीव करण्यालायक कोणीच नसेल

*                    *                    *

अतिशय दयापात्र कोण ? जो स्वतःचे ध्येय, स्वतःचे मनोरथ सर्व काही वेंचून द्रव्य मिळवू पाहतो तो

[स्वतःच्या कविता विकून गबर होअू पाहणाऱ्या कवीनो, तुम्हाला हे पटते काय ? ]

## १८४

आपण सर्व आपआपल्या हृदयातील अुमेदीच्या शिखरावर चढत असतो आपल्या बरोबरच्या अेखाद्या आरोहकानें जर आपली शिदोरी चोरली आणि आपली पिशवी लाववली, तर आपण त्याची दयाच केली पाहिजे आपले तहानलाडू-भूकलाडू मटकावून जर तो गलेलठ्ठ झाला तर त्याला चढण कठीण जाअील, व आपल्या पैशाच्या पिशवीच्या ओझ्यानें त्याचा रस्ता त्याला लांब व कटाळवाणा वाटेल

अुलटपक्षी तुमच्या रोडपणामुळे जर तुम्हाला त्याचे शरीर फुगल्यासारखें वाटलें तर तुम्ही त्याला अेखादें पाबूल चढण्याला मदत करा तो फुगा हाती आल्याने तुमची गति वाढणार नाही का?

१८५

अेखाद्या मनुष्याचा तुम्हाला जेवढा परिचय असेल त्या मानानेच तुम्हाला त्याची पारख करता येअील. आणि तसे पाहिले तर कोणाचाहि गाढ परिचय असा आपल्याला कितीसा असतो?

१८६

जेत्यानें जिताला अुपदेश केलेला अैकण्याचे देवा! कधीहि माझ्या नशीबी न येवो

*   *   *

विजेत्यानी जितावर राज्य केलेलें त्याना सहन होअील. पण त्यानी त्याना अुपदेश केलेला कसा सहन करावा?

१८७

खरा स्वतंत्र तोच की जो दासाचे ओझें मुकाटयानें अुचलून घेतो.

१८८

हजार वर्षांपूर्वी माझा शेजारी मला म्हणाला, "मला जीवनाचा तिटकारा वाटतो जीवनांमधें दुखावाचून काहीच नाही."

आणि काल अेका स्मशानाजवळून जात असता त्याच्या थडग्यावर जीवन नाचत असलेलें मला दिसलें

## १८९

जीवनकलह म्हणजे काय? तर अनवस्थेनें चालवलेली व्यवस्था स्थापन करण्याची धडपडच होय

## १९०

निर्जन अेकांत म्हणजे आपल्या निर्जीव वाळक्या डाहळ्या मोडून पाडणारें शांत वादळच होय

पण हे तुफान आपली जिवंत मुळें, जिवंत पृथ्वीच्या, जिवंत हृदयांत जास्त खोलवर नेअून पोहोचविते

## १९१

अेकदा मी अेका ओढ्यापुढें समुद्राचें वर्णन केलें ओढ्याला वाटलें की मी कल्पनाशील गप्पीदास आहे

आणि जेव्हा मी समुद्राला ओढ्याविषयी सांगितलें तेव्हा त्याला वाटलें की मी कृपण निंदक आहे.

## १९२

मुंगी अुद्योगी आहे म्हणून तांना मारीत हिंडणाऱ्या टोळाहून ती श्रेष्ठ आहे असें म्हणणाऱ्याची दृष्टि फारच संकुचित म्हटली पाहिजे

## १९३

कोणी सांगावें! अिहलोकांत ज्याला आपण श्रेष्ठ सद्गुण समजतो तो परलोकांत अगदीच कनिष्ठ मानला जात असेल

## १९४

जें गंभीर आहे ते सरळपणें खोलांत शिरतें जें अुत्तुंग आहे ते सरळ वाढू लागतें जें विशाल आहे, त्यालाच वर्तुळक्रमानें पसरता येतें [तेच सर्व बाजूंनी पसरू शकतें]

१९५

वजनमापाची जर आपल्याला कल्पना नसती तर आपण सूर्या-पेक्षा काजव्यासमोर देखील विस्मय-मुग्ध व भक्तिनम्र झालो असतो

*　　　*　　　*

जर आपणामधें लहनमोठा असा भेद नसता तर आपण सूर्याप्रमाणे काजव्याचीहि अुपासना केली असती

१९६

कल्पनाशून्य विज्ञानशास्त्री म्हणजे बोथट सुऱ्या आणि मोडका तराजू घेअून धंदा करणारा खाटीक होय

पण करणार काय? आपण काही सारेच शाकाहारी नाही.

१९७

अुपाशी मनुष्य तुमचें गाणें देखील पोटानेच अैकतो

*　　　*　　　*

भुकेलेला मनुष्य जेव्हा तुमचे गाणें अैकावयास बसतो तेव्हा त्याचे कान त्याच्या पोटात असतात.

१९८

मृत्यु हा नवजात बालकापेक्षा वृद्धाच्याच अधिक जवळ असतो असें काही नाही जीवनाविषयी देखील असेच म्हणता येअील.

१९९

कोणी सांगावें, मर्त्य लोकातील स्मशानयात्रा म्हणजे देवदूताच्या घरची वरातहि असेल!

## २००

अेखाद्या सत्याला विस्मृतीचे मरण येणें, आणि मरता मरती त्यानें आपल्या अुत्तरक्रियेसाठी व थडगें बांधण्यासाठी सात हजार सत्यघटनांची आपल्या मृत्युपत्रात नोंद करून ठेवणें शक्य आहे

[सत्यसिद्धान्ताचे जर आकलन झालेलें नसेल तर नुसत्या सत्य घटनांच्या ज्ञानानें सत्याचे आकलन होअू शकेल असें नाही अुलट त्या सत्य घटना सत्याला गाडून टाकण्याच्याच अुपयोगी पडावयाच्या ]

## २०१

खरें पाहू गेलें तर, आपण जेव्हा जेव्हा बोलतो तेव्हा तेव्हा स्वतशीच बोलत असतो परन्तु केव्हा केव्हा दुसऱ्यांना अैकू जावें अितकें मोठ्यांदा आपण बोलतो अेवढेंच

## २०२

अुघड किंवा सहज-सिद्ध गोष्ट म्हणजे कोणी तरी अगदी सोप्या शब्दात मांडेतोपर्यंत आपल्या ध्यानांत मुळीच न येणारी गोष्ट

## २०३

माझ्या हृदयात जर आकाशगंगा नसती तर ती मला दिसली तरी कशी असती व ओळखता तरी कशी आली असती ?

## २०४

मी जर वैद्यातला वैद्यराज नसतो तर मी ज्योतिषी आहे हे त्यांना खरें वाटलें नसते

२०५

समुद्राला जर शिंपेची व्याख्या विचारली तर तो म्हणेल 'मोती' आणि कालाजवळ जर कोळशाची व्याख्या मागितली तर तो म्हणेल 'हिरा'.

*           *           *

समुद्राचें लोणी म्हणजे मोती कोळशाचें लोणी म्हणजे हिरा

२०६

वासना किवा हौस प्रकाशात जाअून अुभी राहिली म्हणजे तिच्या छायेला कीर्ति म्हणतात

२०७

मूळ म्हणजे कीर्तीविषयी बेपर्वा असलेलें फूल

२०८

सौंदर्याच्या बाहेर धर्महि नाही आणि विज्ञानहि नाही

२०९

मला माहीत असलेल्या प्रत्येक थोर अिसमाच्या मनोरचनेंत काहीतरी क्षुद्रपणा होता आणि त्या क्षुद्रपणानेंच त्या थोर पुरुषाला अकर्मण्यता, वेड आणि आत्महत्येपासून वाचविले आहे

२१०

जो कोणाचाहि स्वामी बनत नाही व कोणालाहि आपला स्वामी बनू देत नाही तोच मनुष्य खरा थोर होय.

२११

मनुष्यप्राणी गुन्हेगाराचा आणि प्रेषिताचा वध करतो अेवढया-वरूनच काही त्याला मी प्राकृत किंवा पामर समजणार नाही

२१२

सहिष्णुता म्हणजे दर्पज्वरानें पछाडलेलें प्रेम.

२१३

(हाडाचा कणा नसलेले) किडे देखील प्रतिकार करावयास तयार होतात, पण हत्तीदेखील मअू येतात हे नवल नव्हे काय ?

२१४

मतभेद हाच कदाचित दोन मनामधील अगदी जवळचा रस्ता असेल

२१५

मीच ज्वाला आहे आणि मीच पाचोळा आहे माझाच अेक अंश माझ्या दुसऱ्या अंशाला जाळून फस्त करतो

२१६

आपण सर्वच पुण्यगिरीच्या शिखराचे यात्रेकरू आहोत. आपण जर भूतकाळाला वाटाड्या न समजता नकाशा समजलो तर आपला रस्ता किती तरी वाचेल

२१७

ज्या शहाणपणाला मानीपणामुळे रडता येत नाही, गंभीरतेमुळें हसण्याची लाज वाटते, आणि जो अहंकारामुळें लोकांच्या सहवासाला विटतो, तो शहाणपणाच नव्हे

२१८

तुम्हाला ठाऊक असलेल्या सर्व ज्ञानानें जर मी माझें डोकें भरून काढलें तर तुम्हाला जें ठाऊक नाही तें भरण्याला जागा कोठून आणावयाची?

२१९

वाचाळापासून मी मौन शिकलो, असहिष्णु लोकापासून मी सहिष्णुता शिकलो, आणि निर्दय लोकापासून मी दया शिकलो. पण माझ्या या गुरुविषयी मी अगदीच कृतघ्न कसा!

२२०

हटवादी धर्मवीर म्हणजे कोणाचेच न ऐकू शकणारा व्याख्यान-वाचस्पति

२२१

मत्सरी लोकाच्या मौनात देखील गलबला भरलेला असतो

२२२

जाणण्याजोग्या गोष्टीच्या अंताला जेव्हा तुम्ही पोहचता तेव्हा अनुभवण्याजोग्या गोष्टीचा प्रारंभ होतो

२२३

अतिशयोक्ति म्हणजे चिरडीस आलेले सत्य

२२४

प्रकाशानें व्यक्त होणारें तेवढेंच जर तुम्हाला दिसत असेल आणि ध्वनीनें जाहीर होणारें तेवढेंच जर तुम्हाला ऐकू येत असेल,

तर तुम्हाला खरोखर काही दिसत नाही आणि काही ऐकूहि येत नाही.

२२५

घटना म्हणजे वांझ सत्य होय

२२६

अेकाच वेळी विनोद करणें आणि निष्ठूर होणें हे शक्य नसते [व योग्यहि नसते ]

२२७

मला अंतःकरणापासून आवडणारे असे दोघेजण आहेत. राज्य नसलेला राजा आणि भिक्षा न मागतां येणारा भिकारी

२२८

निर्लज्ज विजयापेक्षा लाजाळू पराजय हजार पटीनें श्रेष्ठ होय.

२२९

शेतांत कोठेंहि खणा, तुम्हाला तेथें ठेवा हा सापडावयाचाच मात्र तुम्हीं खणलें पाहिजे शेतकऱ्याच्या श्रद्धेनें

२३०

वीस शिकारी आणि त्याचे वीस कुत्रे अेका कोल्ह्याचा पाठलाग करीत असता तो म्हणतो, "हे मला मारतील यात सशय नाही पण किती मठ्ठ आणि पामर वेटे ! केवळ अेका माणसाला मारण्यासाठी, वीस कोल्हे, कधी वीस लाडगे बरोवर घेअून, वीस गाढवावर वसून शिकार करावयास तयार होतील काय ? "

२३१

आपण केलेल्या कायद्यापुढें आपली मान तुकवते आपलें मन पण आपला आत्मा, आपले चैतन्य कधीच तसे करीत नाही

२३२

मी एक प्रवासी व खलाशी आहे. दररोज मला माझ्या हृदयात नवे नवे प्रदेश सापडतात.

२३३

एक बाई आग्रहपूर्वक म्हणाली, "ते युद्ध खात्रीनें धर्मयुद्ध होतें माझा मुलगा नाही का त्या युद्धात कामास आला ?"

२३४

मी जीवनाला म्हणालो, "मला मृत्यूची वाणी ऐकावयाची आहे"

आणि लगेच जीवनानें आपल्या आवाजाचे सप्तकच काय तें वाढवलें आणि ते म्हणालें, "ऐक आता ही मृत्यूची वाणी"

२३५

जीवनातील सर्व कोडी सोडवली म्हणजे शेवटी आपल्याला मृत्यु हवासा वाटतो, कारण तेहि जीवनाचे एक कोडेंच आहे

२३६

जन्म आणि मरण हे शौर्याचे सर्वोच्च असे दोन प्रकार आहेत

२३७

मित्रा, जोपर्यंत तू बोलणार नाहीस आणि मी ऐकणार नाही, आणि तुझा आवाज तो माझाच आवाज होय, हे मी ओळखणार नाही आणि तुझ्यासमोर उभें राहिलें असता मी एका आरशासमोर उभा राहिलो आहे असें मला वाटणार नाही, तोपर्यंत आपण दोघेहि जीवनाला पारखे राहू, एकमेकाना ओळखणार नाही एवढेंच नव्हे तर आपल्याला स्वतःला देखील स्वतःची ओळख पटणार नाही.

## २३८

शहाण्या लोकांनी मला सांगितले, "तू जर स्वतःला ओळखू शकलास तर सर्व लोकांना तू आपोआप ओळखू शकशील "

मी त्यांना म्हणतो, "पण जेव्हा मी सर्वांना शोधू लागेन तेव्हाच तर स्वतःला ओळखू शकेन "

## २३९

प्रत्येक माणसात दोन माणसें असतात एक अंधारात जागत असतो आणि दुसरा प्रकाशात निजलेला असतो

[अंधारात जागणारा आणि प्रकाशात निजणारा असे दोघे जेव्हा अेकमेकांचे शिष्य होतील तेव्हाच खरें ज्ञान प्रगट होवील.]

## २४०

खरा विजनवासी वैरागी म्हणजे विश्वाचा सामर्थ्यानें अखंड आस्वाद घेता यावा म्हणून शकलाच्या जगाचा त्याग करणारा.

## २४१

विद्याव्यासंगी आणि कवि यांच्यामध्यें अेक हिरवेंगार शेत पसरलें आहे, विद्वान जर त्या शेतातून पलीकडे गेला तर तो ज्ञानी बनेल, आणि कवि जर त्याच शेतातून आरपार गेला तर तो पैगंबर बनेल.

## २४२

काल संध्याकाळी मी अेक नवल पाहिलें कित्येक तत्त्वज्ञानी स्वतःची डोकी पाट्यांत भरून विकावयास निघाले होते. "ज्ञान घ्या हो ज्ञान! कोणाला ज्ञान विकत घ्यावयाचे आहे काय?"

काय करतील बिचारे तत्त्वज्ञ! हृदयाचे पोट भरण्यासाठीं डोके विकल्यावाचून त्यांना गत्यंतरच नाही

## २४३

एक तत्त्वज्ञानी रस्त्यावरील भंग्याला म्हणाला, "मला तुझी कीव येते तुझें काम सर्वात कठीण व ओंगळ आहे"

भंगी म्हणाला, "आपली कृपा आहे, पण आपण कोणते काम करता, सांगा पाहू?"

तत्त्वज्ञ म्हणाला, "मी मनुष्याचे मन, त्याच्या क्रिया आणि त्याच्या वासना याचे अध्ययन करीत असतो"

भंग्यानें रस्ता लोटणें पुन चालू केलें आणि हसत म्हणाला, "आणि मलाहि तुमची कीव येते"

## २४४

सत्य सिद्धात बोलून दाखविणाऱ्यापेक्षा तो ऐकणारा कांही कमी नसतो

*　　　　*　　　　*

सत्याचे श्रवण करणारा त्याचे प्रतिपादन करणाऱ्याहून काही कमी थोर नसतो

## २४५

आवश्यक वस्तु कोणत्या आणि चैनीच्या कोणत्या यातील मर्यादा कोणालाहि ठरवता येत नाही देवदूतानाच काय ती ठरवता येते देवदूत तसेच शहाणे व सावध असतात

कदाचित् देवदूत म्हणजे तरी हवेत विहार करणारे आपलेच सद्विचार असावयाचे

२४६

फकीराच्या हृदयात ज्याला आपले सिंहासन सापडतें तोच खरा राजा।

२४७

आपल्या संपतीहून अधिक देणे ही अुदारता, आपल्या गरजेहून कमी घेणें म्हणजे मानीपणा होय

२४८

खरें पाहता आपण कोणाचेंहि काही देणे लागत नाही परतु आपल्या सर्वस्वासाठी आपण समष्टीचे म्हणजे समस्त मानवजातीचे ऋणी असतो

२४९

जे जे लोक भूतकालात होअून गेले, ते ते सर्व या क्षणी आपल्या बरोबर राहत आहेतच आपल्याला आतिथ्यधर्म कसा सोडता येअील ?

२५०

ज्याची अुत्कठा अधिक तोच जास्तीत जास्त जगतो

२५१

लोक म्हणतात, हातातल्या अेका पक्ष्याची किंमत झाडावरच्या दहा पक्ष्याबरोबर आहे

मी म्हणतो, झाडावरचा अेक पक्षी आणि अेक पीस हातातल्या दहा पक्ष्याहून अधिक आहे

आणि ते पीस मिळवण्याची तुमची धडपड म्हणजे पायाला पख असलेला जीवन-पक्षी होय, किंवा ते जीवनच होय

२५२

या जगात दोनच मूळ तत्त्वें, दोनच महाभूते आहेत: सौंदर्य आणि सत्य सौंदर्य असते प्रेमिकाच्या हृदयात आणि सत्य असते जमीन नांगरणाऱ्याच्या बाहूत

२५३

अुत्कट सौंदर्य मला आपल्या पाशात बद्ध करते पण त्याहूनहि अेक श्रेष्ठ सौंदर्य आहे की, जें मला स्वतच्या देखील बंधनातून मुक्त करतें

२५४

जो सौंदर्य पाहतो त्याच्या डोळ्यात सौंदर्य जितकें चकाकते त्यापेक्षा जो सौंदर्यासाठी तळमळतो त्याच्या हृदयात ते अधिक अुज्ज्वलपणानें वसत असते

२५५

जो मनुष्य आपलें मन माझ्यापुढें अगदी अुघडें करून दाखवितो त्याला मी चाहतो, जो आपली स्वप्नें आणि आपल्या आकांक्षा याच्याशी माझा परिचय करून देतो त्याच्याविषयी मला आदर वाटतो पण जो माझी सेवा करतो त्याच्या समोर मला लाजल्यासारखें, किंचित् बंरमल्यासारखें, का वाटते बरें?

२५६

प्रतिमाशाली लोकाना पूर्वीच्या काळी राजसेवा करण्यात मोठा अभिमान वाटे

तेच लोक आता रक्तसेवा करण्यातच आपली प्रतिष्ठा आहे असे म्हणू लागले आहेत

२५७

देवदूतांना ठाऊक आहे की, किती तरी व्यवहारचतुर लोक आपली भाकरी कल्पनावीराच्या निढळाच्या घामाच्या मदतीने खात असतात.

[मनुष्यानें स्वतःचा आहार स्वतःच्या निढळाच्या घामानें मिळवावा असें धर्मशास्त्रांत सांगितलें आहे पण जगातले सगळे धूर्त लोक भोळ्या प्रतिभावान लोकांच्या निढळाच्या घामाचा फायदा घेऊन आपली चंगळ करीत असतात ही त्यांची शिताफी फक्त देवदूतांनाच उमगून येते]

२५८

विनोद किंवा कोटीबाजपणा हा पुष्कळदा वस्तुस्थिति लपवण्यासाठी धारण केलेला मुखवटा असतो तो बुरखा जर तुम्ही फाडून टाकलात तर आंत चिडलेली प्रतिभा तरी सापडेल अथवा हातचलाखी करीत असलेले चातुर्य दिसेल

२५९

शहाणे लोक माझ्यात शहाणपणा पाहतात, आणि मठ्ठ लोक मला मठ्ठ समजतात मला वाटते दोघेहि बरोबर आहेत.

२६०

ज्यांच्या पोटांत गुप्त गोष्टी भरलेल्या असतात त्यांनाच आमच्या पोटातील गुप्त गोष्टी ताडता येतील

* * *

ज्याच्या हृदयात रहस्यें साठवलेली असतात त्यानाच दुस-ऱ्याच्या हृदयातील रहस्यें अुमगतात

## २६१

जो मनुष्य तुमच्या सुखाचा वाटेकरी होण्यास तयार आहे, परतु दुखाचा वाटा घेण्यास तयार नाही तो स्वर्गाच्या सात दरवाजापैकी आपल्या हाती असलेली अेकाची किल्ली घालवून बसतो

## २६२

होय, निर्वाण आहे आपल्या मेंढया हिरव्यागार कुरणात सोडून देणें, आपल्या मुलाला थोपटून निजवणें आणि आपल्या कवितेची शेवटची ओळ लिहून काढणें या सर्वांत निर्वाणच आहे

## २६३

आपल्याला होणारा आनद किंवा वाटणारें दुख आपण पूर्वीच निवडून ठेवलेलें असतें

## २६४

विषाद म्हणजे दोन अुद्यानामधील भिंत होय

## २६५

आपलें सुख किंवा दुःख फार मोठें झालें म्हणजे जग आपोआप लहान होतें

## २६६

वासना म्हणजे अर्धे जीवन आणि अुदासीनता (वेपर्वाअी) म्हणजे अर्धे मरण

* * *

रति म्हणजे अर्धे जीवन, अरति म्हणजे अर्धे मरण

## २६७

आजच्या दुःखातील अतिशय कडू भाग म्हणजे कालच्या आनंदाचें स्मरण होय

## २६८

लोक मला सांगतात की अिहलोकीचीं सुखें व परलोकाची शांति या दोहोंपैकी कोणतें तरी अेकच तुम्हाला पसंत करतां येअील

मी त्यांना म्हणतो, "पण मी तर अिहलोकीचा आल्हाद आणि परलोकीची शांति दोन्ही पसंत केली आहेत [मला अैहिक आणि मरणोत्तर दोन्ही मुक्ति हव्या आहेत व मला दोन्ही मिळणार] कारण माझें अंतःकरण मला ग्वाही देतें की, त्या परम कवीनें अिहलोक आणि परलोक मिळूनच अेक श्लोक लिहिला आहे अिहलोकाचा पूर्वार्ध आणि परलोकाचा अुत्तरार्ध ह्या दोहोमध्यें प्रास आणि यमक कसे ततोतंत जुळतात!"

## २६९

[सहाराच्या वाळवंटात अेखादा लहानसा झरा जर कोठें असला तर त्याच्या आसपास नारळासारखीं चार पांच झाडें अुगवतात, आणि तेथें छोटेखानी नंदनवन तयार होतें समुद्रात

जशी वेटे तसें वाळवटात हें रणद्वीप अिंग्रजीत त्याला 'ओअेसिस' म्हणतात अशा रणद्वीपापर्यंत जायला वैलाचा ताडा कामाचा नाही काटक अुटच तेथपर्यंत पोहोचू शकतात ]

श्रद्धा म्हणजे हृदयप्रदेशात विलसणारें अेक रणद्वीप होय. वुद्धीच्या ताडयाच्या साह्यानें मात्र तेथपर्यंत पोहोचता येणार नाही

## २७०

जेव्हा तुम्ही पोक्त व्हाल आणि आपले शिखर गाठाल तेव्हा तुम्हाला भुकेचीच भूक राहील, अधिक तहानेची तहान लागेल; आणि वासनेचीच हौस राहील

## २७१

तुम्ही जर आपल्या गुप्त गोष्टी वाऱ्याला सागितल्या तर त्यानें त्या झाडाना कळविल्यावद्दल त्याला तुम्ही दोष कां द्यावा ?

## २७२

वसताची फुले म्हणजे देवदूताच्या न्याहारीच्या वेळी सागितलेली हिवाळ्याची स्वप्नें होत.

## २७३

अेकदा अेक अूद निशिगवाला म्हणाला, "पहा मी कसा धावतो तो ! धावणें तर वाजूलाच राहिलें, तुला चालता किंवा रागताहि येत नाही "

गुलछवू नाक दावून म्हणाला, "अहो, तुरगम-राज मेहेरवानी करून पळ काढा, जोरानें धावा "

## २७४

रस्त्याविषयी माहिती सशापेक्षा कासवानाच अधिक असते

ज्या प्राण्याना पाठीचा कणा नसतो त्यानाच देवाने टणक मजबूत पाठ दिलेली असते हे आश्चर्य नव्हे काय ?

[ चारित्र्याच्या तेजाला पाठीच्या कण्याची अुपमा देतात ज्याला कोणीहि कसाहि वाकवावा, कोणीहि वळवावा अशा मनुष्याविषयी म्हणतात की त्याला कणाच नाही, कणखरपणाच नाही अशा लोकाना देव निर्लज्जपणाचें कवच देअून ठेवतो.

रग नसली तर निदान खमगपणा तरी असावाच ]

## २७६

जो अतिशय वाचाळ असतो त्याच्यात बुद्धि अगदी कमी असते मोठमोठ्यानें व्याख्यानें झोडणारा आणि अेक वार, दोन वार म्हणून लिलाव पुकारणारा याच्यात फारसा फरक नसतो

## २७७

वडिलाच्या कीर्तीनें आणि चुलत्याच्या सपत्तीनें जर दवलें जावें लागलें नाही तर तुम्ही अीश्वराचे आभारच मानले पाहिजेत

आणि तुमच्या कीर्तीनें आणि सपत्तीनें तुमच्या मागें कोणालाहि दवलें जावें लागलें नाही तर याबद्दल अीश्वराचे आभार त्याहूनहि अधिक माना

[ वडिलाच्या कीर्तीमुळें आणि चुलत्याच्या सपत्तीमुळें “वडे बापके बेटे” म्हणवून घेणें नको आणि आपल्यामुळें आपल्या वशजावरहि तशीच टीका होणे नको ]

## २७८

कोल्हाटी खेळ करीत असता त्याचा नेम जेव्हा चुकतो तेव्हाच मला त्याच्या खेळात काही मजा वाटते

कोल्हाट्यानें फेकलेला चेंडू त्याला झेलता आला नाही म्हणजेच मला गम्मत वाटते

२७९

जो माझा हेवा करतो तो नकळत माझी वाखाणणीच करीत असतो

२८०

प्रथम तुम्ही दीर्घकालपर्यंत आआीच्या झोपेंतील अेक स्वप्न होता ती जागी झाली व तिनें तुम्हाला जन्म दिला

२८१

आअीला लेकुरवाळी व्हावें असे वाटतें, म्हणूनच वशाचा विस्तार होतो

*  *  *

मातेची वाछा हेंच वशाचें वीज

२८२

माझ्या आअीवापाना आपल्याला अेक मूल असावें असे वाटलें आणि त्यानी मला जन्म दिला

मला वाटलें की आपल्याला आअीवाप असावेत म्हणून मी रात्रीला आणि समुद्राला जन्म दिला

[आपण म्हटले असते, पृथ्वीला व आकाशाला जन्म दिला कारण द्यावापृथ्वी हीच मनुष्यजातीची मातापितरें होत ]

२८३

काही मुलामुळें आपल्याला कृतार्थता येते, धन्यता वाटते, आणि काहीमुळें पश्चात्तापच होतो

# २८४

रात्र होऊन काळोख झाला आणि तुम्ही जर काळे असाल तर पडून राहा आणि स्वेच्छेने काळेच व्हा.

आणि पहाट झाल्यानंतर देखील जर तुम्ही काळेच राहिला तर ताठ उभे राहून दिवसाला अभिमानानें सांगा की अजून मी काळाच आहे

' दिवसाची किंवा रात्रीची खुशामत करणे वेडेपणाचे आहे

दोघेहि तुम्हाला हसतील

[ दिवसापुढें किंवा रात्रीपुढें खोटया आविर्भावाने वतावणी करणे मूर्खपणाचे आहे 'गंगा गये गंगादास, जमना गये जमनादास' होण्यात काहीच प्रतिष्ठा नसते ]

# २८५

पहाड चुक्यात सापडला म्हणून काही टेकडी ठरत नाही, आणि वडाच्या झाडाला पावसानें झोडपले म्हणून काही तें एरंड होत नाही.

# २८६

हे एक कोडेंच नव्हे का? उच आणि खोल याचे एकमेकाशी जेवढें सख्य असते तेवढेंहि त्याचे सपाटीशी नसते.

[ देव आणि दानव हे एकमेकाना जितके जवळ आहेत तितके ते मानवाना जवळ नाहीत विचित्र खरेंच ! ]

# २८७

जेव्हा मी तुझ्यापुढें एक आरसा होऊन उभी राहिलें तेव्हा तुला माझ्यात स्वतःचेच प्रतिबिंब दिसलें

तू म्हणालास, "मी तुझ्यावर प्रेम करतो"

पण खरें सांगावयाचे म्हणजे माझ्यामधून देखील तू स्वतःवरच प्रेम करीत होतास

## २८८

जेव्हा शेजाऱ्यावर प्रेम करण्यात तुम्हाला आनंद वाटू लागतो तेव्हा त्याला सद्गुण म्हणता येत नाही [ कारण तेव्हा तुम्हाला त्याचे कष्ट वाटत नाहीत ]

## २८९

प्रेमाला जर नित्य भरतें येत नसेल, अुकळ्या फुटत नसतील, तर त्याला ओहोटी लागली आहे, क्षयरोग झाला आहे, असें निश्चित समजावे

## २९०

तारुण्य आणि त्याचे ज्ञान ही अेकाच वेळी अेकत्र नांदू शकत नाहीत.

तारुण्य असते तेव्हा तें जगण्यातच अितकें गर्क असते की त्याला स्वतःचे ज्ञान करून घेण्याला वेळ नसतो, आणि ज्ञानाला अितकें काही आत्मसंशोधन करीत बसावें लागते की त्याला जगण्याला फुरसत नसते

## २९१

आपल्या सौधाच्या खिडकीत बसून येणाऱ्या जाणाऱ्याकडे पाहत असता, अेका बाजूनें अेक भिक्षुणी आणि दुसऱ्या बाजूनें अेखादी वेश्या जर येताना तुम्ही पाहिली तर तुम्ही सहज म्हणाल, "पाहा, अेकीचे जीवन किती थोर व दुसरीचे किती हीन!"

पण जर तुम्ही डोळे झाकून जरा कान द्याल तर तुम्हाला आकाशवाणी अैकू येअील की, "अेक प्रार्थनेच्या जोरावर मजकडे येअू पाहत आहे आणि दुसरी आपल्या वेदनेच्या जोरावर आणि दोघींच्याहि हृदयामध्यें माझ्यासाठी अेक मंदिर थाटलेलें आहे"

## २९२

दर शभर वर्षांनी लेबेनॉनच्या पर्वतावर अेका बागेमध्ये नॅझारेथचा येशू ख्रिस्त्याच्या येशूला भेटतो त्याचा बराच वादविवाद होतो, आणि दर खेपेला नॅझारेथचा येशू ख्रिस्त्याच्या येशूला असे म्हणून त्याचा निरोप घेतो की, "बाबारे, आपले कधीहि अेकमत होअील असें दिसत नाही "

## २९३

ज्याची चंगळ आहे त्याच्या पोटाला देवानीच घालावे

## २९४

थोर पुरुषाला दोन हृदयें असतात [विश्वाचें दुःख पाहून] अेकातून भळभळ रक्त वाहत असते, आणि दुसरें [स्वतःला होणारा अन्याय निमुटपणें] सहन करीत असते

## २९५

अेखाद्याच्या खोटें बोलण्यानें जर तुमचे किंवा कुणाचेच नुकसान होत नसेल तर मनातल्या मनात असें का मानीत नाही की त्याच्या सत्याच्या घरात त्याचे कल्पनातरंग मावत ना, म्हणून तो घर सोडून बाहेर पडला

## २९६

दरवाजा झाकलेला असला म्हणजे त्याच्या पाठीमागे सात कुलपें घातलेले रहस्य आहे असें वाटू लागते

[झाकली मूठ सव्वा लाखाची बुरख्याच्या आत नेहमी अप्सराच असावी असे वाटते ]

२९७

वाट पाहणे किंवा प्रतीक्षा करणे म्हणजे कालाश्र्वाच्या दुगाण्या होत.

२९८

नवीन येणारे संकट म्हणजे तुमच्या घराच्या पूर्वेकडील भिंतीत तयार झालेली नवीन खिडकी नसेल कशावरुन?

२९९

ज्याच्या बरोबर तुम्ही हसला त्याला तुम्ही विसरु शकाल पण ज्याच्या बरोबर तुम्ही रडला त्याला कधीच विसरु शकणार नाही

*   *   *

[सुखाचा साथी अंतरेल दु खाचा साथी कधीहि दुरावत नाही.]

३००

मिठात खरोखर काही तरी अद्भुत पावित्र्य असावें ते आपल्या अश्रूतहि असते व समुद्रातहि

*   *   *

लवणात खरोखर काही तरी विलक्षण पावित्र्य असले पाहिजे. ते आपल्या आसवातहि सापडते आणि विशाल अर्णवातहि सापडते.

३०१

जनार्दन हरीला जेव्हा तहान लागते, तेव्हा तो दवबिंदु आणि अश्रुबिंदु दोघानाहि पिऊन टाकण्याचा अनुग्रह करतो

३०२

आपण म्हणजे आपल्या विराट आत्म्याची शकले आहोत, घासासाठी भुकेलेलें तोंड आहोत, आणि तहानेल्या ओठासाठी हातात पेला वरुन असणारे आंधळे हात आहोत

[जीवात्मा म्हणजे आपल्याच अंतरात्म्याच्या प्रासादाच्या दाराशी भिक्षा मागणारा याचक होय ]

३०३

स्वदेश, स्ववंश आणि अहंकार यांच्या भूमिकेपेक्षा अेक वीत जरी तुम्ही वाढला तरी तुमच्यात देवत्व प्रगट होअील

३०४

तुमच्या जागी मी असलो तर समुद्राला ओहोटी लागली म्हणून काही मी तक्रार करणार नाही

जहाज मजबूत आहे तांडेल हुषार आहे तुमच्या पोटातच मळमळते त्याला काय करणार ?

३०५

जें आपल्याला हवे असते पण मिळत नाही त्याची गोडी जें मिळालेलें असते त्याहून अधिक वाटते

३०६

जर आपल्याला ढगावर आरूढ होता आलें तर दोन देशां-मधील सरहद्द दिसणार नाही, मग दोन शेतांमधील हद्दीचा दगड कोठून दिसणार ?

आपल्याला ढगावर स्वार होता येत नाही अेवढेंच दुर्दैव

३०७

सातशे वर्षांपूर्वी अेका दरीतून सात सफेत पक्षी हिमालयाच्या धवल गिरीकडे गेले त्या पक्ष्यांना पाहणाऱ्या सात जणांपैकी अेक जण म्हणाला, " सातव्या पक्ष्याच्या पंखावर मला अेक काळा तीळ दिसत आहे "

आज त्या दरीतील लोक सांगतात की, नात काळे पक्षी हिमालयाच्या शिखराकडे अुडत गेले होते

३०८

पानगळ ऋतु आला तेव्हा मी माझी सगळी दुःखे गोळा केली व माझ्या बागेमध्ये पुरून टाकली.

पुढे जेव्हा चैत्र महिना आला आणि वसताने पृथ्वीशी लग्न लावले तेव्हा माझ्या बागेत अशी काही अपूर्व सुदर फुले अुगवली की नेहमीच्या अितर फुलापेक्षा ती विशेष खुलून दिसू लागली

शेजारी मडळी ती फुले पाहून खुप खुष झाली व मला म्हणाली, "पुन जेव्हा पानगळ ऋतु येअील आणि पेरणीचे दिवस येतील तेव्हा आम्हाला या तुमच्या नव्या फुलाच्या चार बिया द्या ह, आम्ही देखील असली फुले आमच्या बागेत लावू!"

३०९

मी माझा रिकामा हात पुढे करावा आणि लोकानी मला काहीच देअू नये हे तर दुर्दैव खरेच! पण मी भरलेला हात पुढे करावा आणि मजकडून, घेण्यासाठी कोणीच नमावे, ही त्याहून भयकर निराशा आहे!

३१०

मला अानत्याची अितकी अुत्कठा वाटते, कारण तेथे मला माझ्या सगळ्या न लिहिलेल्या कविता आणि न चितारलेली चित्रे भेटणार आहेत

३११

कला म्हणजे निसर्गापासून आनत्याकडे जाण्याचे अेक पाअूल

३१२

कलाकृति म्हणजे धुके कोरून तयार केलेली मूर्ति.

३१३

रिकामटेकड्या हातापेक्षा काटयाचा मुकुट करणारे हात देखील पत्करले

३१४

आपले पवित्रतम अश्रु कधी आपल्या डोळयाचा आश्रय शोधीत नसतात

३१५

प्रत्येक मनुष्य आजवर होऊन गेलेल्या प्रत्येक राजाचा आणि प्रत्येक गुलामाचा वशज आहे

३१६

येशूच्या पणजोबाला जर ठाऊक असते की आपल्या वशात केवढा मोठा सत्पुरुष येणार आहे, तर त्यानें स्वत चेच चरणतीर्थ नसते का घेतले ?

३१७

मेरीला येशूविषयी जे प्रेम वाटत होते त्यापेक्षा जुडासच्या आईला जुडासविषयी कमी प्रेम वाटत असेल काय ?

*          *          *

देवकीला कृष्ण जितका प्यारा होता त्याचेपेक्षा गांधारीला दुर्योधन कमी प्रिय होता काय ?

३१८

माझी येशूविषयीचे तीन चमत्कार बायबलमध्यें लिहिलेले आढळत नाहीत पहिला चमत्कार हा की तो तुमच्या-आमच्या-सारखाच मनुष्य होता, दुसरा हा की त्याच्यात विनोदवृत्ति होती,

आणि तिसरा म्हणजे आपण जित असूनहि जेते आहोत याची त्याला खात्री होती

## ३१९

क्रुसावर चढलेल्या येशो! तुला क्रुसावर खिळला नसून माझ्या हृदयावर खिळला आहे आणि तुझ्या हातात ठोकलेले खिळे माझ्या काळजाच्या पडद्यावर ठोकले गेले आहेत

आणि अुद्या जेव्हा अेखादा अनोळखी मनुष्य या गोलगोथ्याच्या (वधस्यानाच्या) रस्त्यावरून जाअील तेव्हा त्याला समजणार सुद्धा नाही की येथे दोघाचे रक्त वाहिले आहे

त्याला वाटेल की हे अेकाचेच रक्त आहे

## ३२०

तुम्ही नगाधिराज वन्य-गिरीविषयी अैकले असेलच

आपल्या दुनियेतील तो सर्वात अुच पर्वत आहे

जर तुम्ही त्याच्या शिखरावर जाअून पोहोचाल तर अेकच वासना तुमच्या मध्ये अुरेल, आणि ती ही की, पर्वतावरून खाली अुतरून खालील खोल दरीतील लोकाबरोबर राहावयास मिळावे

म्हणूनच तर त्याचे वन्य-गिरि असें नाव पडले आहे

## ३२१

जे जे म्हणून विचार मी शब्दबद्ध करितो त्याना मी क्रियेच्या द्वारा मुक्त केलेच पाहिजे

[विचाराना वाणीच्या बंधनात कोंडल्यानतर तदनुसार आचरणानेंच त्याना मुक्त करिता येते स्वतःच्या अुक्ति-बद्ध विचाराना कृति-मुक्त करणारे सव्यसाची पुरुष जगात किती असतील ? ]